# ज्योतिषसार



हा ग्रंथ संस्कृत ग्रंथावरून जनार्दन भास्कर भट्ट क्रमवंत यांणी महाराष्ट्र भाषेंत करून सर्व ज्योतिष यावर प्रीति करणारे जे यांस परम आदराने नजर केला असे




मुंबईंत

गणपत कृष्णाजी यांचे छापखान्यांत छापिला





शके १७८०

कालयुक्त नाम संवत्सरे माहे श्रावण शुद्ध १३




# प्रस्तावना



हा ग्रंथ श्रीशुकदेवविरचित ज्योतिषसार व मुहूर्तमार्तंड आणि बृहस्पतिवाक्यें व रत्नकोश व सिद्धांतशिरोमणी व निर्णयसिंधू आणि दुसऱ्याही अनेक ग्रंथांतील वाक्यें घेऊन बालबोधार्थ धर्मप्रवृद्धि व्हावी ह्मणून याचें महाराष्ट्रभाषांतर श्री कुलाबा प्रांतांतील थळ ग्रामवासी क्रमविदित्युपनामक भास्कर सुत जनार्दन भट्ट यांणी मुंबापुरींत गणेशवाडीमध्यें महादेव भट्ट शेंडयेयांचे आश्रयानें राहून बापूजोशी वाडेघांडेकर यांचे कांहीं साह्यानी यथामति यथाज्ञानें करून- श्लोकार्थ प्राकृत केला आहे मी केवळ मूढमतीचा ज्योतिष न जाणतां व्युत्पत्तिही नाहीं असा भिक्षुक मात्र आहें याजकरितां विद्वानांस माझी प्रार्थना हीच आहे कीं या ग्रंथांतील शुद्धाशुद्ध असल्यास सुज्ञांनी सांभाळून घ्यावें



# अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका





श्री



# शकप्रकरण.

## संवत्सरनामपरिज्ञान.

श्रीगणेशायनमः॥ ॥श्लोक॥ ॥शकेंद्रकाला
र्कयुतः कृत्वाशून्यरसैर्हृतः॥शेषाःसंवत्सराज्ञे
याःप्रभवादिबुधैःक्रमात्॥१॥ ॥७॥

टीका

शालिवाहन शकांतील ज्या संवत्सराचें नाव पाहिजे तो शक मांडावा, त्यांत १२ मिळवावे, आणि ६० नीं भागावें. शेष राहील तें त्या संवत्सराचें नाव जाणावें.

## संवत् परिज्ञान.

सएवपंचाग्निकुभिर्युक्तः स्याद्विक्रमस्यहि॥रे
वायाउत्तरेतीरेसंवन्नाम्नातिविश्रुतः॥२॥ ॥

टी०—जो शालिवाहनाचा शक त्यांत १३५ मिळवावे म्हणजे विक्रम संवत् जाणावा.

## संवत्सरनामानि.

प्रभवोविभवःशुक्लःप्रमोदोथप्रजापतिः॥अंगि
राःश्रीमुखोभावोयुवाधातातथैवच॥१॥ईश्वरोब
हुधान्यश्चप्रमाथीविक्रमोवृषः॥चित्रभानुःस्वभानु
श्चतारणःपार्थिवोव्ययः॥२॥सर्वजित्सर्वधारीच
विरोधीविकृतिःखरः॥नंदनोविजयश्चैवजयोमन्मथदु
र्मुखो॥३॥हेमलंबोविलंबीचविकारीशार्वरीप्लवः॥

शुभकृच्छोभनःक्रोधीविश्वावसुपराभवौ ॥४॥
प्लवंगःकीलकःसौम्यःसाधारणविरोधिकृत्॥परि
धावीप्रमादीचआनंदोराक्षसोनलः॥५॥पिंगलःका
लयुक्तश्चसिद्धार्थीरौद्रदुर्मतिः॥दुंदुभीरुधिरोद्गारीर
क्ताक्षीक्रोधनःक्षयः॥६॥ ॥७॥ ॥

टीका

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | प्रभव | १६ | चित्रभानु | ३१ | हेमलंब | ४६ | परिधावी |
| २ | विभव | १७ | सुभानु | ३२ | विलंबी | ४७ | प्रमादी |
| ३ | शुक्ल | १८ | तारण | ३३ | विकारी | ४८ | आनंद |
| ४ | प्रमोद | १९ | पार्थिव | ३४ | शार्वरी | ४९ | राक्षस |
| ५ | प्रजापति | २० | व्यय | ३५ | प्लव | ५० | अनल |
| ६ | अंगिरा | २१ | सर्वजित् | ३६ | शुभकृत् | ५१ | पिंगल |
| ७ | श्रीमुख | २२ | सर्वधारी | ३७ | शोभन | ५२ | काळयुक्त |
| ८ | भाव | २३ | विरोधी | ३८ | क्रोधी | ५३ | सिद्धार्थी |
| ९ | युवा | २४ | विकृति | ३९ | विश्वावसु | ५४ | रौद्र |
| १० | धाता | २५ | खर | ४० | पराभव | ५५ | दुर्मति |
| ११ | ईश्वर | २६ | नंदन | ४१ | प्लवंग | ५६ | दुंदुभि |
| १२ | बहुधान्य | २७ | विजय | ४२ | कीलक | ५७ | रुधिरोद्गारी |
| १३ | प्रमाथी | २८ | जय | ४३ | सौम्य | ५८ | रक्ताक्षी |
| १४ | विक्रम | २९ | मन्मथ | ४४ | साधारण | ५९ | क्रोधन |
| १५ | वृष | ३० | दुर्मुख | ४५ | विरोधिकृत् | ६० | क्षय |

## संवत्सराचें फळ.

प्रभवात्द्विगुणंकृत्वात्रिभिर्न्यूनंचकारयेत्॥सप्त
भिस्तुहरेद्भागंशेषंज्ञेयंशुभाशुभम्॥ एकंचत्वारि
दुर्भिक्षंपंचद्वाभ्यांसुभिक्षकम्॥त्रिषष्ठेतुसमंज्ञे
यंशून्यंपीडानसंशयः॥२॥ ॥५॥

टी०— प्रभवादिसंवत्सरापासून चालते संवत्सरा पावेतो मोजावे आणि

ते दुप्पट करावे त्यांतून तीन काढावे बाकी राहील तीस सातांनी भागावें. शेष उरेल त्याचें शुभाशुभ फळ पाहावें. तें असें कीं एक अथवा ४ उरले तर महर्गता ॥ ५ अथवा २ उरले तर सुभिक्षता ॥ ३ अथवा ६ उरले तर धारण सम राहील ॥ आणि शून्य आलें तर जनास पीडा जाणावी.

### संवत्सरांचे स्वामी.

युगं भवेद्वत्सर पंचकेन युगानि च द्वादश वर्षषष्ट्या ॥
भवंति तेषामधिदेवताश्च क्रमेण वक्ष्यामि मुनि प्रणी
ताः ॥ १ ॥ विष्णुर्जीवः शक्रो दहनस्त्वष्टा अहिर्बुध्न्यः पि
तरः ॥ विश्वेदेवाश्चंद्रज्वलनौ नासत्यनामानौ च भगः ॥

टी० — पांचा वर्षांचें एक युग या प्रमाणें साठा संवत्सरांचीं युगें १२ आणि त्यांचे स्वामी १२॥ विष्णु १ बृहस्पति २ इंद्र ३ अग्नि ४ ब्रह्मा ५ शिव ६ पितर ७ विश्वेदेव ८ चंद्र ९ अग्नि १० अश्विनी कुमार ११ सूर्य १२.

### भेद.

संवत्सरः प्रथमकः परिवत्सरोन्यस्तस्मादिडान्विदि
तिपूर्वपदाद्भवेयुः ॥ एवंयुगेषु सकलेषु लदीयनाथा
वन्ह्यर्कसीतगु विरिंचि शिवाः क्रमेण ॥ २ ॥

टी० — इष्टशकाला ५ नीं भागावें शेष राहील तें संवत्सराचें नाव अनुक्रमें जाणावें॥. प्रथम संवत्सराचा स्वामी वन्हि ॥ १ ॥ द्वितीय परिवत्सराचा स्वामी अर्क ॥ २ ॥ तृतीय इडावत्सराचा स्वामी चंद्र ॥ ३ ॥ चतुर्थ अनुवत्सराचा स्वामी ब्रह्मा ॥ ४ ॥ पंचम इद्वत्सराचा स्वामी शिव ॥ ५ ॥

### अन्यमतेतु.

आनंदादि भवे द्ब्रह्मा भावादिर्विष्णुरेव च ॥ जयादि
शंकरः प्रोक्तः सृष्टि पालन नाशकाः ॥ १ ॥ ॥

टी० — आनंदादिक संवत्सर २० त्यांचा स्वामी ब्रह्मा तो सृष्टिकर्त्ता ॥ १ ॥ भा

चादिक संवत्सर २० त्यांचा स्वामी विष्णु तो पालनकर्ता ॥२॥ जयादिक संवत्सर २० त्याचा स्वामीरुद्र तो संहार कर्ता ॥३॥ ॥५॥

---

## ऋतुप्रकरण.

### अयन.

शिशिरपूर्वमृतुत्रयमुत्तरेत्ययनमाहुरहश्चतदामरं भवतिदक्षिणमन्यऋतुत्रयंनिगदितारजनीमरुतांहिसा॥१

टी०-शिशिर, वसंत, ग्रीष्म, त्या तीन ऋतूंत उत्तरेस सूर्याची गति होत्ये त्यास उत्तरायण ह्मणावें. तो देवांचा दिवस ॥ ॥ वर्षाऋतु, शरदृतु, हेमंतऋतु, त्या तीन ऋतूंत सूर्याची गति दक्षिणेस होत्ये त्यास दक्षिणायन ह्मणावें ती देवाची रात्र होय.

### अयनामध्यें शुभाशुभकर्में.

गृहप्रवेशत्रिदशप्रतिष्ठाविवाहचौलव्रतबंधदीक्षाः॥सौम्यायनेकर्मशुभंविधेयंयद्गर्हितंतत्खलुदक्षिणेच ॥ १ ॥ ॥ ६ ॥ ॥५॥

टी०-गृहप्रवेश, देवप्रतिष्ठा, विवाह, आणि चौल, व्रतबंध, मंत्रग्रहणादिक ही शुभकर्मे उदगयनांत करावीं. या कर्मांहून रहित कर्मे तीं दक्षिणायनांत करावी.

### संक्रांतिपरत्वें ऋतु.

मृगादिराशिद्वयभानुभोगात्षडर्त्तवः स्युःशिशिरोवसंतः॥ग्रीष्मश्चवर्षाश्चशरच्चतद्वद्धेमंतनामाकथितश्चषष्ठः॥१॥ ॥७॥

टी०- मकरादि दोनराशि सूर्यांनी भोगिल्या ह्मणजे एक ऋतु होतो यारीतीनें राशि १२ आणि ऋतु ६ वर्षांत भोगितात. यास उदाहरण

| | | | |
|---|---|---|---|
| १ मकर<br>२ कुंभ | शिशिरऋतु १ | ७ कर्क<br>८ सिंह | वर्षाऋतु ४ |
| ३ मीन<br>४ मेष | वसंतऋतु २ | ९ कन्या<br>१० तूळ | शरदृतु ५ |
| ५ वृषभ<br>६ मिथुन | ग्रीष्मऋतु ३ | ११ वृश्चिक<br>१२ धन | हेमंतऋतु ६ |

## मतांतरराशिपरत्वें

मेषादितोद्विद्विभभानुभोगाद्वसंत पूर्वाऋतवः षडुक्ताः ॥ २ ॥ ॥ ७ ॥

| | | | |
|---|---|---|---|
| १ मेष<br>२ वृषभ | वसंतऋ. | ७ तूळ<br>८ वृश्चिक | शरदृ. |
| ३ मिथुन<br>४ कर्क | ग्रीष्मऋ. | ९ धन<br>१० मकर | हेमंतऋ. |
| ५ सिंह<br>६ कन्या | वर्षाऋ. | ११ कुंभ<br>१२ मीन | शिशिर. |

## मासपरत्वें.

चैत्रादिद्विद्विमासाभ्यांवसंताद्यृतवश्चषट् ॥ दाक्षिणात्याः प्रगृह्णन्ति दैवे पित्र्येन्वकर्मणि ॥ २ ॥ ॥ ७ ॥

| | | | |
|---|---|---|---|
| १ चैत्र<br>२ वैशाख | वसंत | ७ आश्विन<br>८ कार्तिक | शरद्. |
| ३ ज्येष्ठ<br>४ आषाढ | ग्रीष्म | ९ मार्गशीर्ष<br>१० पौष | हेमंत |
| ५ श्रावण<br>६ भाद्रपद | वर्षाऋ. | ११ माघ<br>१२ फाल्गुन | शिशिर |

दक्षिणदेशीं देवपितृ कर्मीचा ठायीं घेतात.

# मास प्रकरण.

## मासपरिज्ञान

पूर्वराशिंपरित्यज्यउत्तरांयातिभास्करः ॥ सा राशिः संक्रमाख्यास्यान्मासर्त्वयनहायने ॥ १ ॥ ॥ ७ ॥

टी० – पूर्वराशीचा त्याग करून पुढील राशीस सूर्य जातो तो मेषादि १२ संक्रांती, मास, ऋतु, वर्ष, अयन, यांचे गणने विषयीं होतो ॥ ॥ ७ ॥

दर्शावधिंमासमुशंतिचांद्रंसौरंतथाभास्करराशिभोगात् ॥ त्रिंशद्दिनंसावनसंज्ञमार्या नाक्षत्रमिंदोर्भगणाश्रयाच्च ॥ १ ॥

टी०– चांद्रमास ह्मणजे शुक्लप्रतिपदेपासून अमावास्या पर्यंत होतो सौरमास ह्मणजे सूर्याचा एक राशिभोग झाला त्यास ह्मणावें॥ सावन ह्म० तीस दिवसांचा मास जाणावा ॥ नाक्षत्रमास ह्म० नक्षत्रांचे परिभ्रमण चंद्राने केले त्यास ह्मणतात.

### मासांचींनावेंवसूर्यवदेवता.

मधुस्तथामाधवसंज्ञकश्चशुक्रः शुचिश्चाथनभोनभस्यः॥तथेषऊर्जश्चसहासहस्यस्तपस्तपस्यश्चयथाक्रमेण॥ ॥अरुणोमाघमासेतुसूर्योवैफाल्गुनेतथा चैत्रमासेतुवेदांगोभानुर्वैशाखएवच ॥२॥ज्येष्ठमासेतपेदिंद्रआषाढेतपतेरविः॥ गभस्तिःश्रावणेमासेयमोभाद्रपदेतथा ॥३॥स्वर्णरेताश्वयुजिकार्तिकेच दिवाकरः॥ मार्गशीर्षेतपेन्मित्रः पौषेविष्णुःसनातनः॥ इत्येतेद्वादशादित्यामासनामान्यनुक्रमात् ॥४॥केशवंमार्गशीर्षेतुपौषेनारायणंविदु ॥माधवंमाघमासेतुगोविंदमथफाल्गुने॥५॥चैत्रेविष्णुंतथाविद्याद्वैशाखेमधुसूदनम्॥ त्रिविक्रमंतथाज्येष्ठेआषाढेवामनंविदुः॥६॥ श्रावणेश्रीधरंविद्धिहृषीकेशंतुभाद्रके॥आश्विनेपद्मनाभंचऊर्जेदामोदरंविदुः॥७॥ मार्गशीर्षेविशालाक्षीपौषेलक्ष्मीश्चदेवता॥माघेतुरुक्मिणीप्रोक्ताफाल्गुनेधात्रिनामका ॥८॥चैत्रेमासिरमादेवीवैशाखेमोहिनीतथा॥ पद्माक्षीज्येष्ठमासेतुआषाढेकमलेतिच॥९॥ कांतिमतीश्रावणेचभाद्रेतुअपराजिता॥ पद्मावतीआश्विनेतुराधादेवीतुकार्तिके॥१०॥ ॥७॥ ॥

टीका

| नावें | नावें | | सूर्य | देवी | देवता |
|---|---|---|---|---|---|
| १ | चैत्रमास | मधु | वेदांग | रमा | विष्णु |
| २ | वैशाख | माधव | भानु | मोहिनी | मधुसूदन |
| ३ | ज्येष्ठ | शुक्र | इंद्र | पद्माक्षी | त्रिविक्रम |
| ४ | आषाढ | शुचि | रवि | कमला | वामन |
| ५ | श्रावण | नभ | गभस्ति | कांतिमती | श्रीधर |
| ६ | भाद्रपद | नभस्य | यम | अपराजिता | हृषीकेश |
| ७ | आश्विन | इष | सुवर्णरेता | पद्मावती | पद्मनाभ |
| ८ | कार्तिक | ऊर्ज | दिवाकर | राधा | दामोदर |
| ९ | मार्गशीर्ष | सह | मित्र | विशालाक्षी | केशव |
| १० | पौष | सहस्य | विष्णु | लक्ष्मी | नारायण |
| ११ | माघ | तप | अरुण | रुक्मिणी | माधव |
| १२ | फाल्गुन | तपस्य | सूर्य | धात्री | गोविंद |

वारपरत्वें मासफळ.

पंचार्कवासरेरोगाः पंचभौमेमहद्भयम् ॥ पंचार्कि
वारादुर्भिक्षंशेषावाराःशुभप्रदाः ॥१॥ ॥५॥

टी०- एक्या महिन्यांत ५ रविवार आलेतर रोग फार उत्पन्न होतील. तसेच ५ भौमवार आलेतर भय मोठें उत्पन्न होईल. अथवा ५ शनिवार आलेतर दुर्भिक्ष होईल. शेष राहिले ते वार शुभप्रद जाणावे.

॥ पक्ष ॥

पूर्वापरंमासदलंहिपक्षौपूर्वापरौतौसितनीलसंज्ञौ॥
पूर्वस्तुदैवस्त्वपरश्चपैत्र्यः केचित्तुकृष्णोसितपंचमीतः॥
आदौशुक्लःप्रवक्तव्यः केचित्कृष्णोपिमासके ॥ २॥

टी०— शुक्ल प्रतिपदेपासून पौर्णिमा पर्यंत शुक्लपक्ष॥ आणि वद्यप्रतिपदेपासून अमांत कृष्णपक्ष॥ शुद्धपक्ष देवांचा॥ कृष्णपक्ष पितरांचा॥ ॥ भेद॥ शुक्ल ५ पासून कृष्ण ५ पर्यंत शुक्लपक्ष यारीतीनें कृष्णजाणावा प्रथम शुक्लपक्ष नंतर कृष्णपक्ष तो अमांत मास होतो॥ प्रथम कृष्ण नंतर शुक्ल तो पौर्णिमांत मास होतो॥ हे दोन्ही पक्ष देश परत्वे करून चालू आहेत.

॥ अधिकमास ॥

द्वात्रिंशद्भिर्गतैर्मासैर्दिनैः षोडशभिस्तथा॥ घटिकानां चतुष्केनपतत्यधिकमासकः ॥१॥ ॥ ॥

टी०— ३२ मास १६ दिवस आणि ४ घटिका इतके भोगल्यावर अधिकमासाचा संभव होतो

॥ क्षयमास ॥

असंक्रांतिमासोधिमासः स्फुटं स्याद्द्विसंक्रांतिमासः क्षयाख्यः कदाचित्॥ क्षयः कार्तिकादित्रयेनान्यतः स्यात्तदा वर्षमध्येधिमासद्वयंच ॥१॥ ॥५॥

टी०— ज्या महिन्यांत संक्रांत नाही तो अधिक मास आणि ज्या महिन्यांत २ संक्रांति येतात तो क्षयमास तो कार्तिकादि तीनमासांत येतो तेव्हां एकावर्षांत दोन अधिकमास येतात

॥ सिद्धांतशिरोमणौ ॥

गतोब्ध्यद्रिनंदैर्मितेशाककाले तिथीशैर्भविष्यत्यथांगाक्षसूर्यैः॥ गजाद्यग्निभूभिस्तथाप्रायशोयंकुवेदेंदुवर्षैः क्वचिद्गोकुभिश्चेति ॥१॥ ॥६॥

टी०— पूर्वी ज्या शकांत क्षयमास जाहला असेल त्या शकापासून १४१ वर्षांचे अंतरानें क्षयमास येतो आणि पुढें एखादे समयीं १९ वर्षांनी क्षयमास आंत किंवा बाहेर येतो. यास प्रत्यंतर, ९७४ चे श-

क्रांत क्षयमास भुक्त जाहला. आणि पुढें क्षयमास येणें तो १११५, १२५६, १३७८, शकांत होईल. आणि या पुढें १४१, १९, वर्षांचे अंतराने क्षयमास येईल या प्रमाणें जाणावें.

---

## तिथि प्रकरण.

### तिथीचें परिज्ञान

मासभाच्चांद्रभं यावत् गणयेत्तावदेवतु ॥ यावंतिगणनाद्धानितावत्यस्तिथयः क्रमात् ॥ १ ॥

टी०– चैत्रादि मास १२ ज्या मासाचें नांव त्याच नांवाचें नक्षत्र तें मास नक्षत्र जाणावें ॥ जसें चैत्रास चित्रा, विशाखा, ज्येष्ठा, पूर्वाषाढा, श्रवण, पूर्वाभाद्रपदा, अश्विनी, कृत्तिका, मृग, पुष्य, मघा, पूर्वाफाल्गुनी. या प्रकारें मास नक्षत्रें अनुक्रमें जाणावीं. ॥ त्या मास नक्षत्रां पासून दिवस नक्षत्रा पावेतों मोजावें जी संख्या होईल ती तीथ जाणावी. परंतु पोर्णिमांत मासा पासून मोजावें म्हणजे गणित बराबर येईल.

### वारसंज्ञा परिज्ञान.

प्रतिपत्सिद्धिदाप्रोक्ताद्वितीयाकार्यसाधिनी॥तृतीयारोग्यदात्रीचहानिदाचचतुर्थिका॥१॥शुभातुपंचमीज्ञेयाषष्टिकाचशुभामता॥सप्तमीतुशुभाज्ञेयाअष्टमीव्याधिनाशिनी॥२॥मृत्युदात्रीतुनवमीद्रव्यदादशमीतथा॥एकादशीतुशुभदाद्वादशीसर्वसिद्धिदा॥३॥त्रयोदशीसर्वसिद्धाज्ञेयाचोग्रचतुर्दशी॥पुष्टिदापोर्णिमाज्ञेयाचमावास्याऽशुभातिथिः॥४॥ ॥स्वामी॥ ॥वह्निर्विरिंचोगिरिजागणेशःफणिर्विशाखोदिनकृन्महेशः॥दुर्गांतकोविष्णुहरिस्मरश्च शर्वःशशीन्चेतिपुराणदृष्टाः अमायाःपित

रः प्रोक्तास्तिथीनामधिपाः क्रमात् ॥१॥ ॥संज्ञा॥ नंदाचभद्राचजयाचरिक्ताः पूर्णेतिसर्वास्तिथयः क्रमास्स्युः॥कनिष्ठमध्येष्टफलाश्चशुक्ले कृष्णेभवंत्युत्तममध्यहीनाः॥१॥ ॥पालन॥ ॥कूष्मांडबृहतीफलानि लवणंवर्ज्यंतिलाम्लंतथातैलंचामलकंदिवंभ्रवसनाशीर्षकपालांत्रकम्॥ निष्पावांश्चमसूरिकाफलमथोघृंताकसंज्ञंमधुघृतंस्त्रीगमनंक्रमात्प्रतिपदादिष्वेवमाशोडश॥८॥ ॥५॥ ॥५॥ ॥

टीका

| तिथीचे फळ | | स्वामी | संज्ञा | | | तिथीपालन |
|---|---|---|---|---|---|---|
| तिथी | फळ | | नाव | शुक्ल | कृष्ण | करणेतें |
| प्रतिपदा | सिद्धि | अग्नि | नंदा | अशुभ | शुभ | कोहळा |
| द्वितीया | कार्यसाधन | ब्रह्मा | भद्रा | अशुभ | शुभ | डोरली |
| तृतीया | आरोग्य | गौरी | जया | अशुभ | शुभ | लवण |
| चतुर्थी | हानि | गणेश | रिक्ता | अशुभ | शुभ | तिल |
| पंचमी | शुभा | सर्प | पूर्णा | अशुभ | शुभ | आंबट |
| षष्ठी | अशुभा | स्कंद | नंदा | मध्यम | मध्यम | तेल |
| सप्तमी | शुभा | सूर्य | भद्रा | मध्य० | मध्य० | आंवळा |
| अष्टमी | व्याधिना. | शिव | जया | मध्य० | मध्य० | नारळ |
| नवमी | मृत्यु | दुर्गा | रिक्ता | मध्य० | मध्य० | भोपळा |
| दशमी | धनदा | यम | पूर्णा | मध्य० | मध्य० | पडवळ |
| एकादशी | शुभा | विश्वेदेव | नंदा | शुभ | अशुभ | पावटे |
| द्वादशी | सर्वसिध्दा | हरि | भद्रा | शुभ | अशुभ | मसूर |
| त्रयोदशी | सर्वसि० | मदन | जया | शुभ | अशु० | वांगे |
| चतुर्दशी | उग्रा | शिव | रिक्ता | शुभ | अशु० | मधु |
| पौर्णिमा | पुष्टिदा | चंद्र | पूर्णा | शुभ | ० | घृत |
| आमावा० | अशुभ | पितर | ० | ० | अशुभ | स्त्रीसंग |

नंदासुचित्रोत्सववास्तुतंत्रक्षेत्रादिकुर्वीततथैवनृत्यं॥
विवाहभूषाशकटाध्वयानेभद्रासुकार्याण्यपिपौष्टिकानि
॥१॥जयासुसंग्रामबलोपयोगिकार्याणिसिध्यंत्यपिनि
र्मितानि॥रिक्तासुविद्विद्वधघातसिध्दिर्विषादिशस्त्रादि
चयांतिसिध्दिम्॥२॥पूर्णासुमांगल्यविवाहयात्रासपौ
ष्टिकंशांतिककर्मकार्यम्॥सदैवदर्शेपितृकर्मसुक्तंनान्य
द्विदध्याच्छुभमंगलानि॥३॥

टी०— नंदा ह्मणजे प्रतिपदा, षष्ठी, एकादशी, या तिथींच्या ठायीं आनंदादि कृत्यें, देवादिकांचे उत्साह, गृहसंबंधी कृत्यें, स्थळ नीट करणें, घेणें, नृत्य संबंधी गीत, वाद्य, इत्यादि कृत्यें करावीं. ॥१॥

भद्रा ह्मणजे द्वितीया, सप्तमी, द्वादशी, या तिथींच्या ठायीं विवाह. डागिने. गाडी. रथ संबंधीं कार्यें. मार्ग नीट करणें. प्रयाण. पुष्टिक्रिया. इ० करावीं॥२ जया ह्मणजे ३, ८, १३, या तिथींच्या ठायीं युद्ध करण्यास सिध्द जें सैन्य त्याचे उपयोगीं तरवार, ध्वज, इत्यादि कार्यें केलीं असतां सिध्द होतात॥३॥ रिक्ता ह्मणजे ४, ९, १४, या तिथींच्या ठायीं विद्वानांचा नाश, आणि घात कर्मांची सिद्धि. विषप्रयोग, शस्त्र प्रयोग इत्यादि उग्र कृत्यें करावीं॥४॥ पूर्णा ह्मणजे ५, १०, १५ या तिथींच्या ठायीं विवाहादि शुभकृत्यें. महायात्रा. शांतिक. पौष्टिक. इत्यादि कार्यें करावीं.॥५॥

अमावास्येस पितृकार्यें मात्र करावीं. ॥

## अष्टदिशांचेस्वामी

रविःशुक्रोमहीसूनुःस्वर्भानुर्भानुजोविधुः॥बुधोबृह
स्पतिश्चैवदिशामीशास्तथाग्रहाः॥ १ ॥७॥ ॥

टी०— पूर्वेचास्वामीरवि॥१॥ आग्नेयेचा स्वामी शुक्र॥२॥ दक्षिणेचास्वामी मंगळ॥३॥ नैर्ऋत्येचास्वामी राहु॥४॥ पश्चिमेचा स्वामी शनि॥५॥ वायव्ये

चा स्वामी चंद्र ॥ ६ ॥ उत्तरेचा स्वामी बुध ॥ ७ ॥ ईशान्येचा स्वामी गुरु ॥ ८ ॥ हे दिशांचे स्वामी व ग्रह जाणावे ॥

## ग्रहांचे वर्ण व जाती.

ब्राह्मणौ जीवशुक्रौ च क्षत्रियौ भौमभास्करौ ॥ सोमसौम्यौ विशौ प्रोक्तौ राहुमंदौ तथांत्यजौ ॥ १ ॥ ॥ ५ ॥

टी० — गुरु, शुक्र, हे ब्राह्मण ॥ मंगळ, रवि, हे क्षत्रिय ॥ बुध, चंद्र, हे वैश्य ॥ राहु, केतु, आणि शनि हे शूद्र होत

## ग्रहांचे वर्ण.

रक्तावंगारकादित्यौ श्वेतौ शुक्रनिशाकरौ ॥ गुरुसौम्यौ पीतवर्णौ शनिराहूसितौ शुभौ ॥ १ ॥ ॥ ७ ॥

टी० — अंगारक सूर्य - यांचा वर्ण तांबडा ॥ गुरु - बुध - यांचा वर्ण पीत ॥ शनि राहु, केतु, यांचा वर्ण काळा आहे.

## वारांवर कर्मे करावयाचीं तीं

### रविवार

राज्याभिषेकोत्सवयानसेवागोवह्निमंत्रौषधशस्त्रकर्म ॥ सुवर्णताम्रोर्णिकचर्मकाष्ठसंग्रामपण्यादि रवौ विदध्यात् ॥ १ ॥ ॥ ७ ॥ ॥ ६ ॥

टी० — रविवारी राज्याभिषेक, गीत, वाद्य, पालखीत बसणें, राजसेवा, गाय, बईल, इ० आणणें, व देणें, हवन, यज्ञादि मंत्रउपदेश देणें, व घेणें, औषध घेणें, व देणें, शस्त्रें, सोनें व तांबे, शाळी इत्यादि वस्त्रें, काष्ठें, युद्धप्रसंग वाणपणा, हीं कर्मे करावीं

### सोमवार.

शंखाब्जमुक्तारजतेक्षुभोज्यस्त्रीवृक्षकृष्यांबुविभूषणाद्याः ॥ गीतं क्रतुक्षीरविकारशृंगीपुष्पांबरारं

भणमिंदुवारे ॥२॥ ॥छ॥ ॥छ॥

टी०— सोमवारीं शंख, कमळें, मोतीं, रुपें, ऊस, भोजन, स्त्रीभोग, झाडें, गवत, उदक, अलंकार, गायन, यज्ञादि, गोरस, गाई, म्हशी, पुष्पें, वस्त्रें, इत्यादि कृत्यें करावीं.

॥ भौमवार ॥

भेदानृतस्तेयविषाग्निशस्त्रवध्याभिघाताहवशाठ्य
दंभान् ॥ सेनानिवेशाकरधातुहेमप्रवालरक्तानि कु
जेविदध्यात् ॥३॥ ॥छ॥ ॥छ॥

टी०— भौमवारीं भेदकरणें, अनृत, चोरी, विष, अग्नि, शस्त्रें, वध, नाश, संग्राम, कपट, दंभ, सैन्यठेवणें, खाणी, धातु, सुवर्ण, प्रवाल, रक्तस्राव, हीं कृ० क०

॥ बुधवार ॥

नैपुण्यपुण्याध्ययनंकलाश्चशिल्पादिसेवालिपिले
खनानि ॥ धातुक्रियाकांचनयुक्तिसंधिव्यायामवादाश्च
बुधेविधेयाः ॥४॥ ॥छ॥ ॥छ॥

टी०— बुधवारीं चातुर्य, पुण्य, अध्ययन, कला, शिल्पशास्त्र, सेवा, लिहिणें, चित्रें काढणें, धातुक्रिया, सुवर्णयुक्ति, सख्यत्व, जाणें, येणें, वादकरणें, हीं कृत्यें करावीं ॥

॥ गुरुवार ॥

धर्मक्रियापौष्टिकयज्ञविद्यामांगल्यहेमांबरवेश्मयात्राः ॥ रथाश्वभैषज्यविभूषणादिकार्यंविदध्यात्सु
रमंत्रिवारे ॥५॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥

टी०— गुरुवारीं धर्म करणें, नवग्रहादिपूजा, यज्ञ, विद्याभ्यास, सौभाग्य, वस्त्रें, गृहकृत्यें, यात्रा, रथ, अश्व, औषधें, नगोटीं, हीं कृत्यें करावीं.

॥ शुक्रवार ॥

स्त्रीगीतशय्यामणिरत्नगंधवस्त्रोत्सवालंकरणादिक
र्म॥ भूपण्यगोकोशकृषिक्रियाश्चसिध्यंतिशुक्र
स्यदिनेसमस्ताः॥६॥ ॥ ५ ॥ ॥

टी०– शुक्रवारीं स्त्रीगायन, शय्या, मणिरत्नें, हिरे, गंध, वस्त्रे, उत्साह, अ-
लंकार, वाणिज्य, गाई, द्रव्य, भांडार, शेतें करणे, इत्यादि कृत्यें करावीं

॥ शनिवार ॥

लोहाश्मसीसत्रपुशस्त्रदासपापानृतस्तेयविषास
विद्यं॥गृहप्रवेशद्विपबंधदीक्षास्थिरंचकर्मार्कसुतेन्हि
कुर्यात्॥७॥ ॥७॥ ॥७॥ ॥

टी०– शनिवारीं लोखंड, तिसें, शिसे कथिल, तलवार, दास, पाप, अनृतभाष-
ण, चोरी, विष, अर्क काढणे, गृहप्रवेश, हत्ती बांधणें, उपदेशादि, ही स्थिर कृ-
त्यें करावी

॥ वार कोष्टक ॥

देवता॥ ॥सूर्यादितःशिवशिवागुहविष्णुकेंद्रका
लाःक्रमेणपतयःकथिताग्रहाणाम्॥ वन्हयंबुभूमि
हरिशक्रशचीविरिञ्चिस्तेषांपुनर्मुनिवरैरधिदेवताश्च
॥१॥ ॥विचारकरण्यासकालपरिमाण॥ ॥पतंगसू
नोर्दिवसाधिपस्यनिशाप्यहश्चैवतुतिग्मभानोः॥ रात्रि
द्वयंचैकदिनंचसोमेशेषग्रहाणामुदयप्रवृत्तिः॥२॥ ॥
दोषादोष॥ ॥नवारदोषाःप्रभवंतिरात्रौदैवेज्यदैत्ये
ज्यदिवाकराणाम्॥ दिवाशशांकार्कजभूसुतानांस
र्वत्रनिंद्योबुधवारदोषः॥३॥ ॥कृत्यें॥ ॥सोमसौ
म्यगुरुशुक्रवासराःसर्वकर्मसुभवंतिसिद्धिदाः॥भा

नुभौमशनिवासरेषुच प्रोक्तमेवरखलुकर्मसिध्यति ॥ ४ ॥ ॥ तैलाभ्यंगासशुभाशुभ ॥ ॥ रविस्तापंकांतिं वितरतिशशीभूमितनयोमृतिंलक्ष्मींसौम्यः सुरपति गुरुर्वित्तहरणम् ॥ विपत्तिंदैत्यानांगुरुरखिलभोगानु गमनंनृणांतैलाभ्यंगात्सपदिकुरुतेसूर्यतनयः ॥ ५ ॥ वस्त्रपरिधान ॥ ॥ जीर्णंरवौसततमंबुभिरार्द्रमिंदौभौ मेशुचेबुधदिनेचभवेद्धनाय ॥ ज्ञानायमंत्रिणिभृगो प्रियसंगमायमंदेमलायचनवांवरधारणंस्यात् ॥ ६ ॥ स्मश्रुकर्म ॥ ॥ भानुर्मासंक्षपयतितथासप्तमार्तंडसू नुर्भौमश्चाष्टौवितरतिशुभंबोधनः पंचमासान् ॥ सप्ते वेंदुर्दशसुरगुरुः शुक्र एकादशेतिप्राहुर्गर्गप्रभृतिमुन यः क्षौरकार्येषुनूनम् ॥ ७ ॥ ॥ विद्यारंभ ॥ ॥ वि द्यारंभः सुरगुरुसितज्ञेष्वभीष्टार्थदायीकर्त्तुश्चायु श्चिरमपिकरोत्यंशुमान्मध्यमोत्र ॥ नीहारांशौभव तिजडतापंचताभूमिपुत्रेछायासूनावपिचमुनयःकी र्त्तयंत्येवमाद्याः ॥ ८ ॥ ॥ ७ ॥ ॥

## टीका

वारांचे कोष्टकांचीं घरें केलीं त्यांची नांवें संकलित लिहिलीं तीं असीं प्रथम वारांचीं नावें. वार स्वामी ह्मणजे पति ॥ २ ॥ देवता ॥ ३ ॥ विचार करण्यास काळ परिमाण ॥ ४ ॥ दोषादोष ॥ ५ ॥ उक्तानुक्त कृत्यें ॥ ६ ॥ तैलाभ्यंग केल्यास शुभाशुभ ॥ ७ ॥ नवें वस्त्र परिधान ॥ ८ ॥ स्मश्रु केल्यास शुभाशुभ ॥ ९ ॥ विद्यारंभास शुभाशुभ ॥ १० ॥ याप्रमाणें नांवें जाणावीं.

| वाराचीनावे | रवि | सोम | भौम | बुध | गुरु | शुक्र | शनि |
|---|---|---|---|---|---|---|---|
| वाराचेपति | शिव | पार्वती | स्कंद | विष्णु | रुद्र | ब्रह्म | इंद्र |
| देवता | अग्नि | उदक | भूमि | हरि | इंद्र | इंद्राणी | ब्रह्मा |
| विचारकरण्यास काळ | ८ प्रहर | २ रात्रि ४ प्रहर | ८ प्रहर | ८ प्रहर | ८ प्रहर | ८ प्रहर | ४ प्रहर |
| दोषादोष | रात्रिदोष | दिनदोष | दिनदोष | रात्रदिनदोष | रात्रिदोष | रात्रि दोष | दिन दोष |
| कृत्ये | उक्तकर्मसिद्धि | सर्वकर्मसिद्धि | उक्तकर्म | कर्मसि॰ | कर्मसि॰ | कर्मसि॰ | उक्तकर्मसि |
| तेलाभ्यंग | ज्वरप्रद | कांतिप्रद | मृत्युप्रद | लक्ष्मीप्रद | वित्तनाश | विपत्तिप्रद | सपत्तिप्रद |
| वस्त्रपरिधा | जीर्णहोतें | ओलेंराहील | शोकप्राप्ति | धनप्राप्ति | ज्ञानप्रा॰ | इष्टसन्मान | मळकट |
| स्मश्रुकर्म | १मासिन्याचा आयुष्यनाश | ७म आ वृद्धि | ८म आ नाश | ५म आ वृद्धि | १०म आ वृद्धि | ११म आ वृद्धि | ७म आ नाश |
| विद्यारंभ | मध्यम | जडत्व | मृत्यु | या तीन वारांस आयुष्याभिवृद्धिअभीष्टार्थ सिद्धि जाणावी | | | मृत्यु |

# नक्षत्रें.

## नक्षत्र परिज्ञान

द्विनिघ्नमासस्तिथियुक्विधूनो भशेषितः स्यादुडुशेषसंख्या ॥ ॥ ६७ ॥ ॥ ६७ ॥

टी॰ – चैत्रादिगतमास त्याचे ते मासास हि दुप्पट करावे आणि त्यांत गततिथि त्याचत्ये दिवसा रूध्या मिळवाव्या आणि येकत्र करून त्यांत एक वजा करावा शेष राहील त्यास सत्ताविसानी भागावे शेष राहील ते नक्षत्र जाणावे

## नक्षत्रसंज्ञापरिज्ञान

शुभाशुभनक्षत्रें ॥ अश्विनीतुशुभाप्रोक्ता भरणीनाशकारिणी ॥ कार्यघ्नीकृत्तिकाचोक्तारोहिणीसिद्धिदाबुधैः ॥ १ ॥ मृगःशुभस्तत्र श्चार्द्रामध्यमस्तुपुनर्वसुः ॥ पुष्यःशुभःसार्पमघापूर्वाःशुक्रनाशमृत्युदाः ॥ २ ॥ उ

त्तरा हस्त चित्रास्तु विद्यालक्ष्मीशुभप्रदाः ॥ स्वाती विशा
खे त्वशुभेमैत्रंसर्वार्थसिद्धिदं ॥ ३ ॥ ज्येष्ठामूलं क्रमा
त्तोयंक्षयनाशार्थहानिदं ॥ विश्वब्रह्मा विष्णवश्च वृद्धि
वृद्धिसुखप्रदाः ॥ ४ ॥ वासवं वारुणं शैवं शक्रभं भद्रं मृ
तिप्रदं ॥ उत्तराभाद्रकं श्रीदं रेवती कामदायिका ॥ ५ ॥
॥ नक्षत्रांचे स्वामी ॥ ॥ भेशा दस्त्रयमाग्निकेंदु गिरिशाः
प्रोक्ता अदित्यं गिरः सर्पाः कव्यभुजो भगोर्यमरविस्व
ष्टाव्हयामारुतः ॥ इंद्राग्निस्त्वथमित्र इंद्रनिर्ऋतिर्नीरंच
विश्वेविधिर्वैकुंठोवसुपाशयजैकचरणाहिर्बुध्न्यपूषाभि
धाः ॥ २ ॥ ॥ अधोमुखनक्षत्रें ॥ ॥ मूलाग्नेयमघाहि
दैवभरणीसार्पाणि पूर्वात्रयंज्योतिर्विद्भिरधोमुखंहि
नवकं भानामिदं कीर्तितम् ॥ ॥ तिर्यङ्मुख ॥ ॥
ज्येष्ठादित्य कराश्विनीमृगशिरः पौषानुराधानित्व
ष्ट्राख्यानि वदंति भानि मुनयस्तिर्यङ्मुखान्येषुतु ॥
॥ ऊर्ध्वमुखन० ॥ ॥ पुष्यार्द्राश्रवणोत्तराशतभि
षक् ब्राह्मश्रविष्ठाव्हयान्यूर्ध्वास्यानि नवोदितानि
मुनिभिर्धिष्ण्यान्यथैतेषुतु ॥ ३ ॥ ॥ ध्रुवन० स्थिर ॥
॥ रोहिणीसहितमुत्तरात्रयं कीर्त्यंति मुनयो ध्रुवा
व्हयं ॥ ॥ मृदु ॥ ॥ त्वाष्ट्रमित्रशशिपूषदेवता
न्यामनंतिमुनयो मृदून्यथ ॥ ॥ लघुन० ॥ ॥ अ
श्विनीगुरुभमर्कदैवतंसाभिजित्सुघुचतुष्टयं मत
म् ॥ ॥ तीक्ष्णन० ॥ ॥ मूलशक्रशिवसार्पदैव
तान्युग्रुपंत्यथच तीक्ष्णसंज्ञया ॥ ॥ चरन० ॥
वैष्णवत्रययुतः पुनर्वसुर्मारुतंच चरपंचकंस्थि

दम्॥ ॥उग्रन०॥ ॥पूर्विकात्रितयमांतिकंम
घेत्युग्रपंचकमिदंजगुर्बुधाः॥ ॥मिश्रन०॥
हव्यवाहभयुतंद्विदैवतंमिश्रमंज्ञमथमिश्रकर्म
कृ॥ ॥चरादिनक्षत्र॥ ॥चरंचलंक्रूरमुशंतिचो
ग्रंध्रुवंस्थिरंदारुणभंचतीक्ष्णं॥क्षिप्रंलघुत्वंमृदु
मैत्रसंज्ञंसाधारणंमिश्रमितिब्रुवंति॥५॥ ॥अं
धादिकनक्षत्रसं०॥ ॥अंधकंतदनुमंदलोचनंम
ध्यलोचनमनःस्फलोचनम्॥रोहिणीप्रभृतिभंचतु
ष्टयंसाभिजिच्चगणयेत्पुनःपुनः॥६॥ ॥नक्षत्रां
चीआकृति॥ ॥तुरगमुखसदृक्षंयोनिरूपंक्षुराभं
शकटसममथैणस्योत्तमांगेनतुल्यं॥मणिगृहशरच
क्रंभातिशालोपमंभंशयनसदृशमन्यच्चात्रपर्यंक
रूपं॥१॥हस्ताकारमतश्चमौक्तिकसमंचान्यत्प्रवा
लोपमंधिष्ण्यंतोरणवत्स्थितंबलिनिभंसत्कुंडलाभं
परं॥क्रुध्यत्केसरिविक्रमेणसदृशंशय्यासमानंप
रंचान्यद्द्विविलासवत्स्थितमतःशृंगानिभंव्यक्ति
मत्॥२॥त्रिविक्रमाभंचमृदंगरूपंवृत्तंततोन्यद्यम
लद्वयाभं॥पर्यंकरूपंमुरजानुकारीइत्येवमश्वादि
भचक्ररूपम्॥३॥७॥नक्षत्रांच्यातारांचीसंख्या
॥वन्हित्रिऋत्विषुगुणेंदुकृताग्निभूतबाणाश्विनेत्र
शरभूकुयुगाब्धिरामाः॥रुद्राब्धिरामरसगुणवे
दशतद्वियुग्मदंताबुधैर्निगदिताःक्रमशोभताराः
॥८॥

| संख्या | नक्षत्रांचीं नावें | शुभाशुभ संज्ञा | स्वामीचीं नावें | मुखसंज्ञा | रूपसंज्ञा नावें | नावें | लोचन संज्ञा | स्वरूपाची आकृति | तारासंख्या |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | अश्विनी | शुभ | अश्विनीकुमार | तिर्यङ्मुख | लघु | क्षिप्र | मंदलोचन | अश्वमुख | ३ |
| २ | भरणी | नाशक | यम | अधोमुख | उग्र | क्रूर | मध्यलो॰ | योनिरूप | ३ |
| ३ | कृत्तिका | कार्यनाश | अग्नि | अधोमु॰ | मिश्र | साधारण | सुलोच॰ | वस्त्यास॰ | ६ |
| ४ | रोहिणी | सिध्धि | ब्रह्मा | उर्ध्वमुख | ध्रुव | स्थिर | अंधलो॰ | शकटास॰ | ५ |
| ५ | मृग | शुभ | चंद्र | तिर्यङ्मु॰ | मृदु | मैत्र | मंदलो॰ | मृगास॰ | ३ |
| ६ | आरद्रा | शुभ | शिव | ऊर्ध्वमु॰ | तीक्ष्ण | दारुण | मध्यलो॰ | मणिसम | १ |
| ७ | पुनर्वसु | मध्यम | देवमाता | तिर्यङ्मु॰ | चर | चल | सुलोच॰ | गृहासम | ४ |
| ८ | पुष्य | शुभ | गुरु | ऊर्ध्वमु॰ | लघु | क्षिप्र | अंधलो॰ | शरासम | ३ |
| ९ | आश्लेषा | शोक | सर्प | अधोमु॰ | तीक्ष्ण | दारुण | मंदलो॰ | चक्रासम | ५ |
| १० | मघा | नाशक | पितर | अधोमु॰ | उग्र | क्रूर | मध्यलो॰ | शाखासम | ५ |
| ११ | पूर्वाफाल्गुनी | मृत्युप्रद | भग | अधोमु॰ | उग्र | क्रूर | सुलोच॰ | शय्यासम | २ |
| १२ | उत्तराफा॰ | विद्या | अर्यमा | ऊर्ध्वमु॰ | ध्रुव | स्थिर | अंधलो॰ | पर्यंकासम | २ |
| १३ | हस्त | लक्ष्मी | रवि | तिर्यङ्मु | लघु | क्षिप्र | मंदलो॰ | हातासम | ५ |
| १४ | चित्रा | शुभदायक | ब्रह्मा | तिर्यङ्मु | मृदु | मैत्र | मध्यलो॰ | मौक्तिक | १ |
| १५ | स्वाती | अशुभदा॰ | वायु | तिर्यङ्मु | चर | चल | सुलोच॰ | पोंवळ्यासम॰ | १ |
| १६ | विशाखा | अशुभदा॰ | इंद्राग्नि | अधोमु॰ | मिश्र | साधारण | अंधलो॰ | तोरणासम | ४ |
| १७ | अनुराधा | सर्वसिद्धि | मित्र | तिर्यङ्मु | मृदु | मैत्र | मंदलो॰ | बलिसम | ४ |
| १८ | ज्येष्ठा | क्षयनाश | इंद्र | तिर्यङ्मु | तीक्ष्ण | दारुण | मध्यलो॰ | कुंडलास॰ | ३ |
| १९ | मूळ | हानिप्रद | राक्षस | अधोमु॰ | तीक्ष्ण | दारुण | सुलोच॰ | वांद्रास॰ | ११ |
| २० | पूर्वाषाढा | हानि | उदक | अधोमु॰ | उग्र | क्रूर | अंधलो॰ | शय्यास॰ | ४ |
| २१ | उत्तराषा | वृद्धिदा॰ | विश्वेदेव | ऊर्ध्वमु॰ | ध्रुव | स्थिर | मंदलो॰ | हत्तीसम | ३ |
| २२ | अभिजित् | वृद्धिदा॰ | ब्रह्मा | ० | लघु | क्षिप्र | मध्यलो॰ | कोल्ह्यासम | ० |
| २३ | श्रवण | सुखदा॰ | विष्णु | ऊर्ध्वमु॰ | चर | चल | सुलोच॰ | व्यक्ताकार | ३ |
| २४ | धनिष्ठा | शुभदा॰ | वसु | ऊर्ध्वमु॰ | चर | चल | अंधलो॰ | पामरासम | ४ |
| २५ | शततारका | कल्याण | वरुण | ऊर्ध्वमु॰ | चर | चल | मंदलो॰ | मृदंगाकार | १०० |
| २६ | पूर्वाभाद्रप॰ | मृत्युदा॰ | अजैकपात् | अधोमुख. | उग्र | क्रूर | मध्यलो॰ | वर्तुळाकार | २ |
| २७ | उत्तराभाद्र॰ | लक्ष्मी | अहिर्बुध्न्य | ऊर्ध्वमु॰ | ध्रुव | स्थिर | सुलो॰ | यमलाका॰ | २ |
| २८ | रेवती | कामदा॰ | सूर्य | तिर्यङ्मु॰ | मृदु | मैत्र | अंधलो॰ | पर्यंकास | ३२ |

## कार्याकार्यविचार.

### अधोमुख

वापीकूपतडागगर्तपरिखाखातौ निधेरुध्दतिक्षेपौ द्यू

तविलप्रवेशगणितारंभाःप्रसिध्यंतिच॥१॥ ॥६॥

टी०– अधोमुखनक्षत्रें ह्मणजे (मूळ कृत्तिका मघा विशाखा भरणी आश्लेषा पूर्वाफा० पूर्वाषाढा पूर्वाभाद्रपदा) यानक्षत्रांवर विहीर कुवा तलाव उघकण खा ण द्रव्यकाढणें व पुरणें धून बिळात प्रवेश करणें गणितारंभ हीं कर्मे करावी

## तिर्यङ्मुख

अश्वेभोष्ट्रलुलायरासभवृषोरभ्रादिदांतश्चनौगं
श्रीयंत्रहलप्रवाहगमनारंभाःप्रसिध्यंतिच॥२॥

टी०– तिर्यङ्मुख ह्मणजे (ज्येष्ठा पुनर्वसु हस्त अश्विनी मृग रेवती अनुराधा स्वाती चित्रा) या नक्षत्रावर अश्व हत्तीउंट रेडागाढव बैल मेंढा डुकर कुत्रे हीं घेणें, नाव पाण्यांत घालणें गंत्रीयंत्र नांगर धरणें. प्रवाह गमन हीं कर्मे करावी.

## ऊर्ध्वमुख

प्रासादध्वजचर्मवारणगृहप्राकारसत्तोरणोछाया
रामविधिर्हितोनरपतेःपट्टाभिषेकादिच॥३॥ ॥

टी०–ऊर्ध्वमुख ह्म० (पुष्य आर्द्रा श्रवण उत्तराफाल्गुनी उत्तराषाढा उत्तरा भाद्रपदा शततारका रोहिणी धनिष्ठा) यानक्षत्रांवर देवालयें ध्वजा मंडप घरें कोट भिंतितोरणें नाद्दा बाग बांधणें वराज्याभिषेक हीं कर्मे करावीं.

## ध्रुवनक्षत्रें.

बीजहर्म्यनगराभिषेचनारामशांतिषुहितंस्थिरेषुच

टी०– ध्रुवनक्षत्र ह्म० रोहिणी, उत्तराफल्गुनी, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, या नक्षत्रावर बीज पेरणें, नगरांत प्रवेश, राज्याभिषेक, बागाईत, शांति कर्म, इतक्याचे कार्यी हितकारक जाणावें

## मृदुनक्षत्रें

मित्रकार्यरतिभूषणांबरोद्गीतिमंगलविधानमेषुतु॥

टी०- मृदु स्म० मृग, चित्रा, अनुराधा, रेवती, या नक्षत्रांवर मित्रकार्य, स्त्रीसंग, भूषणें धारण, वस्त्रें, गायनादि नाना प्रकारचीं मंगल कार्यें करावीं.

## लघुनक्षत्रें.

पण्यभूषणकलारतौषधज्ञानशिल्पगमनेषुसिद्धिदं॥

टी०- लघु स्म० अश्विनी, पुष्य, हस्त, अभिजित्, या नक्षत्रांवर वाणीपणा, भूषणें धारण करणें, कळाकुशलता, क्रीडाकरणें, औषधें घेणें, ज्ञान, विद्या, सुतारपणा, प्रस्थानकरणें हीं कृत्यें करावीं शुभदायक होतील.

## तीक्ष्णनक्षत्रें.

भूतयक्षनिधिमंत्रसाधनंभेदबंधवधकर्मचात्रतु॥

टी०- तीक्ष्ण स्म० आरद्रा. आश्लेषा, ज्येष्ठा, मूळ, या नक्षत्रांवर भूतें, यक्षादिक, यांची पीडा निवारण, द्रव्यकाढणें, मंत्रसाधन करणें, बंधनभेद करणें, वधकरणें हीं उक्त होत.

## चरनक्षत्रें.

दंतिवाजिकरभेषवाहनारामयानविधिषुप्रशस्यते

टी०- चर स्म० पुनर्वसु, स्वाती, श्रवण, धनिष्ठा, शततारका, या नक्षत्रांवर हत्ती, घोडे, नाना प्रकारचीं वाहनें, बागांत जाणें, पालखी, रथ, यांत बसण्यास प्रशस्त होय.

## उग्रनक्षत्रें.

शाठ्यनाशविषघातबंधनोत्साहशस्त्रदहनादिषु स्मृतं॥

टी०- उग्र स्म० भरणी, मघा, पूर्वाफल्गुनी, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा, यांवर शठत्व करणें, नाश, विषघालणें, बंधन, उत्साह, शस्त्र, जाळणें, हीं कर्मे उक्त होत.

## मिश्रनक्षत्रें.

स्वाभिधानसमकर्मसाधनेकीर्तितानिसकलानिसू
रिभिः ॥

टी०--मिश्र म्ह० कृत्तिका विशाखा, यानक्षत्रांचर जशीध्रुवादिकन
क्षत्र नावें आहेत, त्याप्रमाणे कार्ये करितात.

---

### वस्तूनष्टझालीतीपाहावयाचाप्रकार
### लोचनसंज्ञानक्षत्रांवरून

अंधकेलभतेशीघ्रंमदकेचदिनत्रयं ॥ मध्यकेचचतुः
षष्टीनप्राप्नोतिसुलोचने ॥ १ ॥ ॥ ६४ ॥ ॥

टी० - अंधक नक्षत्रीं वस्तू नष्ट झाली तर लौकर सांपडेल मंद नक्षत्री गेली
असतां तीन दिवशीं सांपडेल. मध्यलोचन नक्षत्री वस्तू नष्टझाली असतां
६४ दिवसानी सांपडेल सुलोचन नक्षत्रावर नष्टझाली तर सांपडणारनाही

### वस्तूकोणत्यादिशेस आहेती पाहावयाचाप्रकार

अंधके पूर्वतोवस्तु मंदकेदक्षिणेतथा ॥ पश्चिमे मध्य
नेत्रेचउत्तरेतुसुलोचने ॥

टी० - अंधक नक्षत्रीं वस्तू हरवली असतां पूर्वेस पाहावी. मंदलोचनीवस्तू
नष्टझालीतर दक्षिणेस पाहावी मध्य लोचनीं साउली असता पश्चिमेस पा
हावी सुलोचनी वस्तू सांडली, तीउत्तरेस पाहावी.

अंधेसद्यः प्राप्यतेवस्तुनष्टंकष्टात्प्राप्यंमंदनेत्रेचतद्वत् ॥
दूरावस्थाप्यंमध्यनेत्रेनलभ्यंनश्रोतव्यंनैवलभ्यंसुनेत्रे

टी०--अंधक नक्षत्रीं सांडली असता वस्तू लवकर सांपडेल. मंदलोच
नी वस्तू प्रयत्नें करून. मध्यलोचनीं वस्तू दूर गेली सापडणार नाहीं सु
लोचनी वस्तू गेली असतां निश्चय पूर्वक सांपडणार नाही.

## नक्षत्रपरत्वें प्रश्न

मघादिआर्यमांतंचसमीपेवस्तुदृश्यते ॥ हस्तादिवसु
पर्यंतमन्यहस्तेचदृश्यते ॥ शततारायमांतंतुस्वगृहेच
स्तुदृश्यते ॥ अग्न्यादिसार्पपर्यंतमदृष्टंदूरगंतथा ॥

टी०— मघादि उत्तराफल्गुनी पर्यंत नक्षत्रीं जर वस्तू हरवली तर समीप सांपडेल. हस्त नक्षत्रा पासून धनिष्ठा पर्यंत वस्तू सांडली असतां दुसऱ्याचे हातीं दृष्टीस पडेल. शततारका पासून भरणी नक्षत्रां पावेतों स्व गृहांत सांपडेल. कृत्तिका पासून आश्लेषा पावेतों सांपडणार नाहीं.

तिथिवारंचनक्षत्रं प्रहरेणसमन्वितं ॥ दिक्संख्य
याहतंचैवसप्तभिर्विभजेत्पुनः ॥ एकेनभूतलेद्र
व्यंद्व्यंचेद्भांडसंस्थितं ॥ तृतीयेजलमध्यस्थं अंत
रिक्षेचतुर्थके ॥ तुषस्थंपंचमेतुस्यात्षष्ठेगोमयम
ध्यगं ॥ सप्तमेभस्ममध्यस्थंइत्येतत्प्रश्नलक्षणम् ॥

टीका— प्रश्नसमयींचीं तिथि, वार, आणि नक्षत्रें भुक्त जाहलीं असतील तितकीं मोजून आणि प्रहर जो असेल तो आंत मिळवून सर्व एकत्र करून आठानीं गुणावें आणि सातांनीं भागावें शेष उरेल त्याचें फळ असें. एक उरला तर भूमींत वस्तू आहे. २ उरले तर भांड्यांत वस्तू आहे. ३ उरले तर जलामध्यें आहे. ४ उरले तर अंतरिक्ष आहे. ५ उरले तर तुसांत आहे. ६ उरले असतां शेणांत ७ उरले तर भस्मांत आहे.

## मद्यारंभ करण्यास.

रौद्रेपैत्र्येवारुणेपौरहूतेयाम्येसार्पेनैर्ऋतेचैवधि
ष्ण्ये ॥ पूर्वाख्येषुत्रिष्वपिश्रेष्ठउक्तोमद्यारंभः का
लविद्भिःपुराणैः ॥

टी०— आरद्रा, मघा, शततारका, ज्येष्ठा, भरणी, आश्लेषा, मूळ,

तीन पूर्वा. या नक्षत्रीं प्रथम मद्य काढणें उक्त आहे.

## नवीनवस्त्रधारण.

रोहिणीपुकरपंचकेश्विभेष्वुत्तरेपिच पुनर्वसुद्वये॥
रेवतीधुवसुदैवतेच भेनव्यवस्त्रपरिधानमिष्यते॥

टी०—रोहिणी. हस्त चित्रा. स्वाती विशाखा. अनुराधा अश्विनी. तिन्ही उत्तरा. पुनर्वसु पुष्य. रेवती धनिष्ठा यांवर नवी वस्त्रें धारण कीजे

## मोत्येंसुवर्णमणिरक्तवस्त्र धारण

नासत्यपौष्णवसुभेकरपंचकेच मार्तंडभौमगुरु मंत्रिशशांकवारे॥ मुक्तासुवर्णमणिविद्रुमदंतशं खरक्तांबराणि विधृतानि भवंति सिध्यै॥ ७॥ ॥

टी०—अश्विनी, रेवती, धनिष्ठा, हस्त, चित्रा, स्वाती, विशाखा, अनुराधा, या नक्षत्रांवर आणि रवि, भौम, गुरु, शुक्र, सोम, यावारांवर मोत्यें, सुवर्ण, मणि, पोंवळीं, हस्तिदंताचे चुडे, नवेशंखाची पूजा करणें, तांबडीवस्त्रे या कृत्यांस शुभ होय.

## पुंसवनासनक्षत्रें.

श्रवणः सकरः पुनर्वसु र्निर्ऋतेर्भंचसपुष्यको मृगः
रविभूसुनजीववासराः कथिताः पुंसवनादिकर्मसु

टी०—श्रवण. हस्त पुनर्वसु मूळ. पुष्य मृग. आणि रवि भौम गुरु हेवार पुंसवनादिक कर्मांस उक्त.

## कर्णवेध

पौष्णावैष्णवकराश्विनीचित्रापुष्यवासवपुनर्वसु मैत्रा॥ सेंदवेश्रवणवेधविधानं निस्तुशंतिमुनयो हिशिशूनां॥ ॥७॥

टी०—रेवती, श्रवण, हस्त, अश्विनी, चित्रा, पुष्य, धनिष्ठा, पुनर्वसु, अनुराधा, मृगशीर्ष, यांवर कर्णवेध मुलांचा करावा.

## अन्नप्राशन

रेवतीश्रुतिपुनर्वसुहस्तब्राह्म्यतः पृथगपिद्वित्रयेन्च ॥
श्युत्तरेषुगदितंहिनयान्नप्राशनंतुऋषिभिः पृथुकानां

टी०—रेवती, श्रवण, पुनर्वसु, हस्त, रोहिणी, मृग, आर्द्रा, तिन्ही उत्तरा, यांवर लहान मुलांस प्रथम अन्नप्राशन करावें.

## श्मश्रुकर्म

पुष्ये पौष्णे चाश्विनी षैंदवेन्चशाक्रे हस्ताद्येत्रिके भे
षदिस्यः ॥ क्षौरं कार्यं वैष्णवाद्यत्रयेन्चमुक्त्वा भौमा
दित्यपातंगिवारान् ॥

टी०—श्मश्रुकरविण्यास पुष्य, रेवती, अश्विनी, मृग, ज्येष्ठा, हस्त, चित्रा, स्वाती, पुनर्वसु, श्रवण, धनिष्ठा, शततारका, हीं नक्षत्रें उत्तम होत, आणि भौम, रवि, शनि, हे वार वर्जावे.

## दंतबंधन

येषुयेषु प्रशंसंतिक्षुरकर्ममहर्षयः ॥ तेषुतेष्वेवशं
संतिनखदंतादिलेखनम् ॥

टी०—दंत बांधणें, व नखें काढणें, यांस जीं श्मश्रु करर्मास नक्षत्रें सांगितलीं आहेत त्यांजवर हीं कृत्यें करावीं.

## श्लोक

आज्ञयानरपतेर्द्विजन्मनांदाहकर्ममृतसूतकेषुन्च
बंधमोक्षमखदीक्षणेषुन्चक्षौरमिष्टमखिलेषुतुष्टि
दम् ॥

टी०—राजाची अथवा ब्राह्मणाची आज्ञा व क्रिया करण्याचे आदींव सू

शततारका. अनुराधा मूळ- मृग याजवर औषधें प्यावीं.

रोगउत्पन्नहोतोत्याचेंशुभाशुभपाहणें

स्वात्याश्लेषारौद्रपूर्वात्रयेषुशाक्रेभौमेसूर्यजेसूर्यवा
रे॥नंदारिक्तास्वेवरोगस्यचाप्तिर्मृत्युर्ज्ञेयःशंकरोर
क्षितापि॥

टी०- स्वाती, आश्लेषा, आरद्रा, तिन्हीपूर्वा, ज्येष्ठा, आणि भौम, शनि, रवि
वार, नंदा तिथी, ह्म० प्रतिपदा, षष्ठी, एकादशी. रिक्ता तिथी ह्म० चतुर्थी, न
वमी, चतुर्दशी यांवर रोग उत्पन्न जाहला तर शंकराचानेंही रक्षण करवणा
रनाहीं

रोगमुक्तिहोण्याचेंप्रमाण.

व्याध्युत्पत्तिर्यस्यपौष्णेसमैत्रेप्राणत्राणंजायते
तस्यकृच्छ्रात्॥वैश्वेसौम्येरोगमुक्तिस्तुमासाद्दिं
शत्स्याद्वासराणांमघास्तु॥

टी०- रोग उत्पन्न होईल त्या दिवशी जर रेवती, अथवा अनुराधा, असल्यातर
प्राणांतक होईल उत्तराषाढा, अथवा मृग असलें तर एकमास पीडा भोगील,
आणि मघा असल्यातर वीस दिवस पीडा भोगील.

पक्षाद्धस्तेवासवेसद्दिदैवेमूलाश्विन्योरग्निधिष्ण्ये
नवाहात्॥याम्येत्वाष्ट्रेवैष्णवेवारुणेचनैरुज्यंस्या
न्नूनमेकादशाहात्॥

हस्त नक्षत्रीं रोगउत्पन्न झाला असतां १५ दिवस पीडा भोगील आणि ध
निष्ठा, विशाखा, मूळ, अश्विनी, कृत्तिका, असल्यातर ९ दिवस पीडा भो-
गील भरणी, चित्रा, श्रवण, शततारका, असल्यातर ११ दिवस पीडा भोगील.

अहिर्बुध्न्येतिष्यसंज्ञेसभाग्येप्राजापत्यादित्ययोः
सप्तरात्रात्॥रोगान्मुक्तिर्जायतेमानवानांनिःसंदि

गधंजस्पितं गर्गमुख्यैः ॥

उत्तराभाद्रपदा. पुष्य. पूर्वाफल्गुनी, अभिजित, पुनर्वसु, या नक्षत्रीं रोग उत्पन्न झाला असतां ७ दिवसांनी पीडा निःसंशयें करून जाईल, असें गर्गादिक मुनी सांगतात.

## रोगमुक्तिस्नानास नक्षत्रें.

इंदोर्वारे भार्गवे च ध्रुवेषु सार्पादित्य स्वाति युक्तेषु भेषु ॥ पित्र्ये चांत्ये चैव कुर्यात्कदाचिन्नैव स्नानं रोगमुक्तस्य जंतोः ॥

सोमवार, शुक्रवार, आणि ध्रुवनक्षत्रें रोहिणी, तिन्ही उत्तरा, आणि आश्लेषा. पुनर्वसु. स्वाति. हीं शुभ होत, आणि मघा. रेवती, यांवर, रोगमुक्त मनुष्यांनीं स्नान करूं नये.

## रोगमुक्तिस्नानास लग्न पाहणें.

लग्ने चरे सूर्यकुजेज्यवारे रिक्तातिथौ चंद्रबले च हीने ॥ केंद्रत्रिकोणार्थगते च पापे स्नानं हितं रोगविमुक्तिकानां ॥

चरलग्नें, मेष, कर्क, तूळ, मकर, हीं लग्नें, रवि, भौम, गुरु, हे वार, आणि रिक्ता तिथी, चतुर्थी, नवमी, चतुर्दशी, असाव्या, आणि चंद्रबळ नसावें. लग्नीं केंद्रस्थानीं त्रितीयस्थानीं पापग्रह असावे. अशी लग्न शुद्धि पाहून स्नान करावें आरोग्य दायक होय.

## लताओषधी व वृक्ष लावण्यास.

सावित्रतिष्याश्विनिवारुणानि मूलं विशाखा च मृदुध्रुवाणि ॥ लतौषधीपादपरोपणेषु शुभानि भानि प्रतिपादितानि ॥

हस्त, पुष्य, अश्विनी, शततारका, मूळ, विशाखा, आणि मृदु, ध्रुव, हीं न

क्षत्रे कोष्टकांत लिहिली आहेत ती घ्यावीं आणि वेळीच औषधी व रक्षण्या याने शुभ होय

## कूपारंभास नक्षत्रें

हस्तास्त्विष्ठेयासवंवारुणंचशैवपित्र्यंत्रीणिचैवोत्तराणि॥प्राजापत्यंचापिनक्षत्रमाहुःकूपारंभेश्रेष्टमाद्यामुनींद्राः॥

हस्त, चित्रा, स्वाती, धनिष्टा, शततारका, आरद्रा, मघा, तिन्ही उत्तरा, आणि रोहिणी, या नक्षत्री, कूपारंभ करावा, असे मुनी सांगतात

## द्रव्य देणें व ठेवणें.

साधारणोग्रध्रुवदारुणाख्यैर्धिष्ण्यैर्यदत्रद्रविणंप्रयुक्तं हस्तेनविन्यस्तवस्त्वथनष्टंनलभ्यतेतन्नियतंकदाचित्॥

साधारणउग्र, ध्रुव, आणि दारुण, या संज्ञेचीं नक्षत्रे कोष्टकांत मागे लिहिली आहेत, ती घ्यावी त्यांजवर दुसऱ्यास द्रव्य दिलें अथवा ठेविले तर लभ्य होणार नाहीं, आणि सांडिली वस्तु सांपडणार नाहीं

## हत्ती घेणें व आणणें.

हस्तेषुचित्रासुतथाश्विनीषुस्वातीषुपुष्येचपुनर्वसौच॥प्रोक्तानिसर्वाण्यपिकुंजराणांकर्माणिगर्गप्रमुखैः शुभानि॥

हस्त, चित्रा, अश्विनी, स्वाती, पुष्य, आणि पुनर्वसु, या नक्षत्रावर हत्ती घेणे, दणे, अलंकार करून शृंगारणे, ही सकळ कर्मे करावी

## घोडा घेणें व आणणें

पुष्यश्रविष्ठाश्विनिसौम्यभेषुपौष्णानिलादित्यकराह्वयेषु॥ सवारुणस्वैपुबुधैः स्मृतानिसर्वाणि

कार्यापितुरंगमाणां ॥

पुष्य, धनिष्ठा, अश्विनी, मृग, रेवती, स्वाती, पुनर्वसु, हस्त, शततारका, यानक्षत्रीं तुरंग घेणें व देणें व अलंकारें करून शृंगारणें, इत्यादि सकळ कार्यें करावीं.

## गवादिपशू आणणें व पोहचविणें यांस वर्ज्य

चित्रोत्तरावैष्णवरोहिणीषु चतुर्दशीदर्शदिवाष्टमीषु ॥ ग्रामं प्रवेशं गमनं प्रदद्यात् ग्राम्यपशूनां न कदाचिदेव ॥

चित्रा, तिन्ही उत्तरा, श्रवण, रोहिणी, चतुर्दशी, अमावास्येस दिवा, अष्टमी, यांचे ठायीं पशूंस बाहेर गांवास पाठवूं नये व आणूंही नये.

## गाय घेणें व विकणें यांस वर्ज्य

शक्रवासवकरेषु विशाखापुष्यवारुणपुनर्वसुभेषु ॥ अश्विपूषभयुतेषु विधेयो विक्रयक्रयविधिः सुरभीणां ॥

ज्येष्ठा, धनिष्ठा, हस्त, विशाखा, पुष्य, शततारका, पुनर्वसु, अश्विनी, रेवती, यां नक्षत्रांचे ठायीं गायींचा क्रय विक्रय करूं नये.

## तृणकाष्ठादिसंग्रह करणें.

वासवोत्तरदलादिपंचके याम्यदिग्गमनगेहगोपनं ॥ प्रेतदाहतृणकाष्ठसंग्रहः शय्यकावितरणं च वर्जयेत् ॥

धनिष्ठांचे उत्तरार्धापासून नक्षत्रें पांच यांचे ठायीं दक्षिणेस जाणें आणि गृह नीट करणें, व प्रेतदाह तृण काष्ठ संग्रह, बाजा, पलंग, आदि करून विणणें हीं सकळ कार्यें वर्जावीं.

## नांगर धरण्यास नक्षत्र.

मृदुध्रुवक्षिप्रचरेषु मूलमघाविशाखासहितेषु भेषु ॥ हलप्रवाहं प्रथमं विदध्यात् भिरोगमुक्तान्वितसौर

भैर्यैः ॥

मृदु, ध्रुव, क्षिप्र, चर, या संज्ञा कोष्टकांतील घ्याव्या, आणि मूळ, मघा, विशाखा, सहित नक्षत्रे यांजवर बैलास मुष्की पाहून प्रथम नांगर धरावा

बीजपेरण्यासन॰

हस्ताश्विपुष्योत्तररोहिणीपुचित्रानुराधामृगरेव
तीषु॥स्वातौधनिष्ठासुमघासुमूलेबीजोप्तिरुक्ता
ष्टफलप्रतिष्ठा

हस्त, अश्विनी, पुष्य, तिन्ही उत्तरा, रोहिणी, चित्रा, अनुराधा, मृग, रेवती, स्वाती, धनिष्ठा, मघा, मूळ, या नक्षत्रावर बिजे पेरावी उक्त होत.

सर्पदंशासवर्ज्य

यः कृत्तिकामूलमघाविशाखासार्पांतकार्द्रासु भु
जंगदष्टः॥ सवैनतेयेनसुरक्षितोपिप्राप्नोतिमृत्योर्व
दनंमनुष्यः॥

कृत्तिका, मूळ, मघा, विशाखा, आश्लेषा, रेवती, आर्द्रा, या नक्षत्रांवर सर्पदंश झाला असतां गरुड संरक्षण करीत असता ही मृत्यु येईल

गायनशिकण्यास.

हस्तस्तिष्योवासवंचानुराधाज्येष्ठापौष्णंवारुणं
चोत्तराञ्च॥ पूर्वाचार्यैःकीर्तितश्चंद्रवर्तीनृत्यारं
भेशोभनोऋक्षवर्गः

हस्त, पुष्य, धनिष्ठा, अनुराधा, ज्येष्ठा, रेवती, शततारका, तिन्हीउत्तरा, आणि चंद्र, अनुकूळ पाहून आरंभ करावा मुनिवाक्य आहे

राज्याभिषेकासनक्षत्रें.

मैत्रशाक्रकरपुष्यरोहिणीवैष्णवेषुतिसृषूत्तरा
सुच॥ रेवतीमृगशिराश्विनीषुचक्ष्माभृतांसम

भिषेकइष्यते ॥

अनुराधा, ज्येष्ठा, हस्त, पुष्य, रोहिणी, श्रवण, तिन्हीउत्तरा, रेवती, मृग, अश्विनी, या नक्षत्रांवर राजांस प्रथम अभिषेक करावा.

राज दर्शनास.

सौम्याश्विनिष्यश्रवणश्रविष्ठाहस्तध्रुवत्वाष्ट्रपूषभानि ॥ मैत्रेणयुक्तानिनरेश्वराणांविलोकनेभानिशुभप्रदानि ॥

मृग, अश्विनी, पुष्य, श्रवण, धनिष्ठा, हस्त, ध्रुव, चित्रा, रेवती, अनुराधा, या नक्षत्रांवर राजांचे दर्शन घ्यावें शुभप्रद होय.

द्वितीयेसचंद्रोदयहोतो त्याचीफळश्रुतीं

रौद्राहियाम्यानिलवारुणेंद्रान्याहुर्जघन्यानितथाबृहंति ॥ ध्रुवद्विदैवादितिभानिनूनंसमानिशेषाणिपुनर्मुनींद्रैः ॥

बृहत्सुधान्यंकुरुतेसमर्घंजघन्यधिष्ण्येभ्युदितोमहर्घः ॥ समेषुधिष्ण्येषुसमंहिमांशुर्वदंतिसंदिग्धमिदंमहांतः ॥

आर्द्रा, आश्लेषा, भरणी, स्वाती, शततारका, ज्येष्ठा, हीं नक्षत्रें जघन्य होत, यांवर मासाचे आदीं चंद्रोदय जाहला असतां धान्याची महर्गता होईल, ध्रुव ह्मणजे तिन्हीउत्तरा, रोहिणी, आणि विशाखा, पुनर्वसु, हीं नक्षत्रें बृहत् होत यांवर चंद्रोदय झाला तर धान्य सवंग होईल. शेषनक्षत्रें सम अशीं जाणावीं त्यांजवर चंद्रोदय झाला तर समधारण असेल.

राशिपरत्वें चंद्रोदयाचें फळ.

मीनेमेषोदितश्चंद्रः सततंदक्षिणोन्नता ॥ शेषे

न्नताउत्तरायांसमतावृषकुंभयोः॥ विड्वरंतुसमे चंद्रेदुर्भिक्षंदक्षिणोन्नता॥ सुभिक्षंक्षेममारोग्यमुत्तराश्रिस्थचंद्रमाः॥

मीन अथवा मेष यां राशींवर शुक्ल द्वितीयेचा चंद्रोदय झालातर चंद्राची दक्षिणेस उन्नता असेल आणि दुर्भिक्षता होईल. मिथुनादिक मकरराशीं पर्यंत चंद्रोदय झाला असतां उत्तरेस चंद्राची उन्नता असेल तेणें करून सुभिक्ष आणि क्षेम आरोग्यता असेल. वृषभ आणि कुंभ यांजवर चंद्रोदय झालातर समत्व चंद्राचें असेल राजांचा कलह, विड्वरता होईल.

## पुष्यनक्षत्राचे गुणदोष.

परकृष्टंनिखिलंनिहंतिपुष्योनखलुनिहंतिपरंतुपुष्यदोषं॥ ध्रुवमष्टमकरोष्टमेपिपुष्येविहितसुपैतिसदैवकर्मसिद्धिं॥

पुष्य, दुसरे दोष आणि अष्टमस्थानी चंद्र असला तथापि दूर करितात परंतु त्या नक्षत्राचे दोष आहेत ते दूर न होता कार्य सिद्धि करतात.

सिंहोयथासर्वचतुष्पदानांतथैवपुष्योबलवानुडूनां॥ चंद्रेविरुध्देप्यथगोचरेपिसिध्यंतिकार्याणिकृतानिपुष्ये

जसा चतुष्पदामध्यें सिंह बलवान् तसेच नक्षत्रामध्ये पुष्य बलवान् होत गोचरींचा चंद्र कनिष्ठ चवथा, आठवा, बारावा, असला तथापि पुष्य कार्य सिद्धी करितो आहे

ग्रहेणविद्धोप्यशुभान्वितोपिविरुध्दतारोपिविलोमगोपि॥ करोत्यवश्यंसकलार्थसिद्धिंविहायपाणिग्रहणंतुपुष्यः॥

पुष्य ग्रहें करून विद्ध अथवा अशुभ ग्रह युक्त किंवा विरुध्द विलोम

तारा असे प्रतिकूळ असतां सकळ कार्य सिद्धि होत्ये. परंतु विवाहातें वर्जून करितात.

## योग प्रकरण

### प्रतिदिवसाचा योग पाहाण्याचीपद्धती

यावत्तेरर्कनक्षत्रंश्रवणाच्चांद्रमेवच ॥ गणयेत्तद्युतिंकुर्याद्योगः स्याहक्षशेषतः

टी०—पुष्यापासून चालत्ये सूर्यनक्षत्रा पावेतों. आणि श्रवणा पासून दिवस नक्षत्रा पावेतों मोजावीं. दोन्ही संख्या एकत्र कराव्या. आणि २७ सांनीं भागावें शेष राहील तो योग जाणावा.

### योगांचींनावें.

विष्कंभः प्रीतिरायुष्मान्सौभाग्यः शोभनस्तथा अतिगंडः सुकर्माच धृतिः शूलस्तथैवच ॥ गंडो वृद्धि र्ध्रुवश्चैवव्याघातोहर्षणस्तथा ॥ वज्रंसिद्धिर्व्यतीपातोवर्याणः परिघः शिवः ॥ सिद्धः साध्यः शुभः शुक्लोब्रह्मैंद्रोवैधृतिः क्रमात् ॥ सप्तविंशतियोगास्तु कुर्युर्नामसमंफलम् ॥ ॥ ५ ॥ ॥ ५ ॥

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | विष्कंभ | ८ | धृति | १५ | वज्र | २२ | साध्य |
| २ | प्रीति | ९ | शूल | १६ | सिधि | २३ | शुभ |
| ३ | आयुष्मान् | १० | गंड | १७ | व्यतिपात | २४ | शुक्ल |
| ४ | सौभाग्य | ११ | वृद्धि | १८ | वर्याण | २५ | ब्रह्मा |
| ५ | शोभन | १२ | ध्रुव | १९ | परिघ | २६ | ऐंद्र |
| ६ | अतिगंड | १३ | व्याघात | २० | शिव | २७ | वैधृति |
| ७ | सुकर्मा | १४ | हर्षण | २१ | सिध | | |

## योग वर्ज घटिका

विरुधसंज्ञाइह येच योगास्तेपामनिष्टः खलुपाद
आद्यः॥ सवैधृतिस्तव्यतिपातनामा सर्वोप्यनिष्टः
परिघस्यचार्धं॥ तिस्रस्तुयोगेप्रथमेच वज्रेव्याघा
तसंज्ञेनवपंचशूले॥ गंडेतिगंडेचपडेचनाड्यः शुभे
षुकार्येषुविवर्जनीयाः॥ ७॥ ॥८॥ ॥९॥

त्या सत्तावीस योगांचे नावाप्रमाणें फळ जाणावे, त्यामध्ये वाईट नावाचे यो-
ग आहेत त्याचे आद्यपाद टाकावे, आणि व्यतिपात, वैधृति, हे सकळ व-
र्ज्यावे परिघाचे पूर्वार्ध टाकावे, परंतु विष्कंभ, ३ घटिका वज्र ३ घ०, व्या
घात ९ घ०, गंड ६ घ०, अतिगंड ६ घ०, शूल १५ घ० त्या वर्ज करून शुभ
कार्ये करावीं

## करणें

### करण पाहाण्याची रीति.

गततिथ्योद्विनिघ्नाश्च शुक्लप्रतिपदादितः॥ एको
नाः सप्तकृच्छेषः करणंस्याद्बवादिकम्॥ ९॥

टी०—शुक्लप्रतिपदे पासून ज्या तिथीची करणें पाहिजेत त्यांची दुप्पट क
रावी, त्यांत एक कमी करावा आणि सातांनी भागावे शेष उरेल तें त्या ति-
थीचें करण जाणावें. प्रति तिथीस २ भोगितात.

### नावें.

बवाव्हयंबालवकौलवाख्यं ततो भवेत्तैतिलनामधे
यं॥ गराभिधानं वणिजंच विष्टिरित्याहुरार्याः कर
णानिसप्त॥ अंते कृष्णाचतुर्दश्यांशकुनीदर्शभाग
योः॥ ज्ञेयंचतुष्पदंनागं किंस्तुघ्नं प्रतिपद्दले॥ ॥

स्वामी॥ ॥ इंद्रोब्रह्मामित्रनामार्यमाभूःश्रीःकी
नाशश्चेतितिथ्यर्धनाथाः॥ कल्युक्षारव्यौसर्पवायु
स्तथैवयेचत्वारस्तेस्थिराणांचतुर्णां॥ ॥कृत्यें॥
पौष्टिकस्थिरशुभानिबवाख्येबालवेद्विजहितान्य
पिकुर्यात्॥ कौलवेप्रमदमित्रविधानंतैतिलेशुभग
ताश्रयकर्म॥ गरेचबीजाश्रयकर्षणानिवाणिज्यके
स्थैर्यवणिक्क्रियाश्च॥ नसिध्दिमायातिकृतंचविष्ट्यां
विषारिघातादिषुतत्रसिध्दिः॥ मंत्रौषधानिशकुनौतु
सपौष्टिकानिगोविप्रराज्यपितृकर्मचतुष्पदेपि॥ सौभा
ग्यदारुणधृतिध्रुवकर्मनागेकिंस्तुघ्नाम्निनिरिवलं
शुभकर्मकार्यम्॥ ॥५॥ ॥५॥

| शुक्लतिथी ६० | | | | कृष्णतिथी ६० | | | | नावें | स्वामी | कृत्यें |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| पूर्वदळ | | उत्तरदळ | | पूर्वदळ | | उत्तरदळ | | | | |
| १ | स्थिर | | · | · | · | · | · | किंस्तुघ्न | वायु | शुभकार्यें करावीं |
| ५ | ८ | १ | १५ | ४ | ११ | ७ | · | बव | इंद्र | प्रतें,उत्साहकरावे,देवळें तळीं बां० |
| २ | ९ | ५ | १२ | १ | ८ | ४ | ११ | बालव | ब्रह्मा | ब्राह्मणाचें हितकरावें |
| ६ | १२ | २ | ९ | ५ | १२ | १ | ८ | कौलव | मित्र | उन्माद आणि मित्रत्व करावें |
| ३ | १० | ६ | १३ | २ | ९ | ५ | १२ | तैतिल | सूर्य | विवाहादिमंगलकार्यें करावीं |
| ७ | १४ | ३ | १० | ६ | १३ | २ | ९ | गर | भूमि | बीजपेरणें नांगर धरणें |
| ४ | ११ | ७ | १४ | ३ | १० | ६ | १३ | वणिज | लक्ष्मी | देवप्रतिष्ठा गृह बांधणें दुकान पा० |
| ८ | १५ | ४ | ११ | ७ | १४ | ३ | १० | विष्टि | यम | सकळकर्मैं वर्ज परंतु विषअरि घातअशीं क्रूरकर्मैं करावीं |
| स्थिर | | ० | ० | ० | ० | ० | १४ | शकुनि | कलि | मंत्रोपदेश औष० ग्रहपूजा करा० |
| स्थिर | | · | · | ३० | · | · | · | चतुष्पाद | बैल | गायह्मैशी घेणें देणें राज्याभिषेक आणि मित्रकार्य करा० |
| स्थिर | | · | · | · | · | · | ३० | नाग | सर्प | सौभाग्यकर्मैं लढाईंतजाणें, धैर्यधरणें विद्याभ्यास करणें |

त्क्लेशः कुक्कुटेमृत्सुरेचच॥१२॥ ॥वस्त्र॥ ॥श्वेत पीतहरितंचपांडुरंरक्तशाममसितंबहुवर्णं॥कंथयो विचसनंघनवर्णान्यंशुकानिचबवादितःक्रमात्॥ १३॥ ॥आयुधें॥ ॥भुशुंडीचगदाखड्गदंडको दंडतोमरान्॥कुंतपाशांकुशास्त्रंचबाणश्चैवायुधं वधात्॥१४॥ ॥भोजनपात्रें॥ ॥सौवर्णराजतं तांम्रंकांस्यंलोहंचखर्परं॥पत्रंवस्त्रंकरोभूमिःकाष्ठ पात्रंबवादितः॥१५॥ ॥भक्ष्यपदार्थ॥ ॥अन्नंच पायसंभक्ष्यंपक्वान्नंचपयोदधि॥चित्रान्नंगुडमध्वा ज्यंशर्करातुबवादितः॥१६॥ ॥गंध॥ ॥कस्तूरीकुं कुमंचैवचंदनंमृत्तिकातथा॥गोरोचनमलक्तश्चहरि द्राचतथांजनं॥सिंदूरमगरुश्चैवकर्पूरश्चबवादित॰ ॥१७॥ ॥जाति॥ ॥देवभूताहिविहगपशवोमृग एवच॥ब्रह्मक्षत्रियविट्शूद्रमिश्रजातिबवादितः ॥१८॥ ॥पुष्पें॥ ॥पुन्नागजातीबकुलश्चकेतकी बिल्वस्तथार्कःकमलंचदूर्वा॥मल्लीतथापाटलिका जपाचबवादिपुष्पाणिचयोजयेत्तु॥१९॥ ॥भूषणें ॥ नूपुरंकंकणंमुक्ताविद्रुमंमुकुटंमणिं॥ गुंजाव राटकंनीलंगरुरुमंरुक्मकंबधात्॥२०॥ कंचुकी ॥ विचित्रपर्णांशुकभूर्जपत्रिकासीत्तातथापाट लनीलवर्णा॥कृष्णाजिनंचर्मचवल्कपांडुराब वादित श्चैवतुकंचुकीस्यात्॥२१॥ ॥वय॥ शिशूकुमारीचगताळकायुवाप्रौढाप्रगल्भाथत तश्चवृध्दा॥वध्यातिवंध्याचसुताथिनीचप्रव्रा

जकान्वैवफलंशुभंवचान् ॥२२॥ ॥७॥

| करण | बव | बालव | कौलव | तैतिल | गर | वणिज | विष्टिः | शकुनी | चतुष्पा. | नाग | किंस्तु. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| स्थिति | बसली | बसली | उभी | निजली | बस० | उभी | बस० | उभी | निज० | निज० | उभी |
| फळें | मध्यम | मध्य. | महर्गता | सर्वंग | मध्य. | महर्ग. | मध्य. | मह. | सवंग | सवंग | महर्ग. |
| वाहनं | सिंह | व्याघ्र | डुकर | गाढव | हत्ती | महिषी | कुत्रें | घोडा | मेंढा | बैल | कोंबडा |
| उपवाह. | गज | अश्व | बैल | मेंढा | गाढव | उंट | सिंह | शार्दूल | ह्मैस | व्याघ्र | वानर |
| फळें | भीति | भीति | पीडा | सुभिक्ष | लक्ष्मी | क्लेश | सुभि. | स्थैर्य | पीडा | स्थैर्य | अपमृत्यु |
| वस्त्रें | पांढरें | पिवळें | हिरवें | पांढुरकें | तांबडें | शाम | काळें | चित्रक | चपाळें | घनवर्ण | पोपटी |
| आयुधें | भुशुंडी | गदा | खड्ग | दंड | धनुष्य | तोमर | कुंता | पाश | अंकुश | तलवार | तीर |
| पात्र | सुवर्ण | रुपें | तांब्र | कांसे | लोह | खापर | पत्र | वस्त्र | कर | भूमि | काष्ठ |
| भक्षण | अन्न | पायस | भक्ष्य | पक्का. | पय | दहीं | चित्रान्न | गूळ | मध | तूप | साकर |
| लेपन | कस्तूरी | कुंकू | चंदन | माती | गोरोचन | मळ | हळद | काजळ | सेंदूर | अगरू | कापूर |
| वर्ण | देव | भूत | सर्प | पशु | मृग | विप्र | क्षत्री | वैश्य | शूद्र | मिश्र | अंत्यज |
| पुष्प | पुन्नाग | जाई | बकुळ | केवडा | बेल | रुई | कमळ | दूर्वा | मोगरा | पाटली | जास्वंद |
| भूषणें | विरोधा | कांकण | मोतें | पोंवळें | मुकुट | मणी | गुंजा | कवड्या | नीळ | पाच | सुवर्ण |
| कंचुकी | विचित्र | वर्ण | हिरवी | भूर्जपत्र | सित. | पांढरी | नीळ | कृष्ण | चर्म | वल्कल | पांडुर |
| वय | बाळ | कुमारी | गतालकी | युवा | प्रौढा | प्रगल्भा | वृद्धा | वंध्या | अतिवंध्या | पुत्रवंती | संन्याशीण |

फळश्रुती

वाहनादिबुधैर्ज्ञेयमथो क्रांतिविशेषतः ॥ वाहनादिक वस्तूनांसंक्रमात्तु विनाशता ॥

टी० – जा वाहनावर बसेल आणि ज्या वस्तू धारण करील त्यांचा नाश आहे.

मुहूर्त

संक्रांति किती मुहूर्तीं होत्ये त्याचीं नक्षत्रें व फळें वे

गवेगळालीं सांगतों.

संक्रांतोमूर्तिभेदाहरपवनयमेवारुणेसार्पऐंद्रेएषा पंचेदुसंज्ञागुरुकरपितृभेचाग्निदस्रेचसौम्ये॥त्वा ष्ट्रेमैत्रेचमूलेश्रुतिवसुचपुषात्रीणिपूर्वास्वरामे ब्रा ह्म्येदित्ये द्विदेवेभवतिशरकुनादुत्तरात्रीणिरुक्षं॥ बाणवेदैःसमर्घस्यान्मध्यस्थंव्योमरामयोः॥ मूर्तौ पंचदशेयातेदुर्भिक्षंच्चप्रजायते॥

टी०— १५मुहूर्त ह्मणजे आरद्रा, स्वाती, भरणी, शततारका, आश्लेषा, ज्येष्ठा, या नक्षत्री आहली तर दुर्भिक्षता प्रजेस जाणावी. आणि ३० मुहू र्त ह्म०-पुष्य, हस्त, मघा, कृत्तिका, अश्विनी, मृग, चित्रा, अनुराधा, मू ळ, श्रवण, धनिष्ठा, रेवती, ३पूर्वा. यानक्षत्रावर आहली असतां धा रण मध्यम जाणावी. ४५ मुहूर्त ह्म० रोहिणी. पुनर्वसू. विशाखा ३उत्तरा या नक्षत्रीं आहलीतर स्वस्थता असावी.

## दुसराप्रकार.

पूर्वसंक्रांतिनक्षत्रात्परसंक्रांतिरूक्षकं॥ द्वित्रि संख्या समर्घस्याच्चतुःपंचमहर्गता॥

गतमास दिनसंक्रांति नक्षत्र आणि प्राप्त संक्रांति दिननक्षत्र याचें अंतर २अथवा ३ आले असतां स्वस्थता. आणि ४ वा० ५ नक्षत्रां- चें अंतर आलें असतां महर्गता

## धान्य घेण्याचें

संक्रांतिनाड्यातिथिवारऋक्षधान्याक्षरंयन्दि हरेत्तुभार्गं॥संक्रांतिनाडीनवमिश्रितान्चसप्ताह तापावकभाजिताच्च॥ एकेसमर्घंद्वितयेचसौम्यं शून्येमहर्घमुनयोवदंति॥

टी०— संक्रांतीच्या घटिका, आणि गत तिथि, वार, नक्षत्रें, व धान्याचीं अक्ष
रें मोजून एकत्र करून ३नीं भागावें असें एकमत. दुसऱ्यामतानें संक्रांति
नाडीमोजून त्यांत ९ मिळवावें आणि ७ नीं गुणावें मग ३नीं भागावें शे-
षउरेल त्याचें फळ १ शेष स्वस्थता धान्याची असेल, २शेष मध्यम अ
सेल, ० शेष महर्गता जाणावी.

## नक्षत्र परत्वें संक्रांतीची पीडा

संक्रांत्यधरनक्षत्राद्गणयेज्जन्मभावधि ॥ त्रिकंष
ङ्कंत्रिकंषङ्कंत्रिकंषङ्कंपुनःपुनः ॥ पंथाभोगोव्यथा
वस्त्रंहानिश्चविपुलंधनं ॥

संक्रांतीचे अधरनक्षत्रापासून जन्मनक्षत्रापावेतों मोजावयाची रीती.
प्रथम. ३पंथा, ६भोग, ३व्यथा, ६वस्त्र, ३हानि, व ६धनप्राप्ति, यारीतीने.

## जन्मर्क्षाचें फळ

यस्यजन्मर्क्षमासाद्यतिथौसंक्रमणंभवेत् ॥ तन्मा
साभ्यंतरेतस्यवैरंक्लेशंधनक्षयः ॥ ॥७॥ ॥

टी०— ज्याचे जन्मनक्षत्रीं संक्रांति जाहली नर वैर पडेल. मासांत जाहली
अ० क्लेश. तिथीवर जाहली असतां धनाचा क्षय जाणावा.

## संक्रांतीचें स्वरूप

षष्टियोजनविस्तीर्णासंक्रांतिःपुरुषाकृतिः ॥ एक
वक्त्रानवभुजालंबोष्ठीदीर्घनासिका ॥ पृष्ठालोका
भ्रमंत्येचगृहीत्वारवपरंकरे ॥ एवंसंक्रमणेयस्याःफ
लंप्रोक्तंमनीषिभिः ॥

टी०— शरीर साठ योजनें लांब, आणि रुंद, पुरुषाची आकृति, एक तों-
ड, ९ भुजा, ओंठ लांब, आणि नासिका लांब, आणि लक्षणें, पुढें पाहत्ये,
मागें चालत्ये, हातांत खापर, आणि भ्रमण करित्ये असें जाणावें.

## हातांत फळ करसें, त्या विषयीं

मेषालिकर्केच तथैव रक्तंचापेच मीनेच तुलेच पीतं॥
श्वेतं वृषेस्त्रीमिथुनेच चंद्रे कृष्णंच नक्रेघ धटेच सिंहे॥
रक्ते फलं भवेद्दुखं श्वेतं चैव सुखं शुभं॥ पीने श्रीस्तु न
था प्रोक्ता श्यामे मृत्युर्न संशयः॥

टी०- मेष, वृश्चिक, कर्क, या राशींचा चंद्र असतां संक्रांतीचा प्रवेश-जाहला तर तिचे हातांत आरक्त वर्णाचें फळ आहे तेणे करून दु:ख प्राप्ति आणि धन, मीन, तूळ, पिवळे वर्णाचे, लक्ष्मीप्राप्ती, वृषभ, कन्या, मिथुन, शुभ्र वर्णाचें, सुख, शुभप्राप्ति, मकर, कुंभ, आणि सिंह, कृष्णवर्णाचे फळ, मृत्युप्राप्ति, ही फळे राशिपरत्वे जनानी घ्यावी

## राशिपरत्वें चंद्र.

याद्दशेन हिमरश्मिमालिना संक्रमो भवतितिग्मरोचिषा॥ ताद्दश फलमवाप्नुयान्नरसाध्यसाध्यपिवशेनशीतगोः॥

असा चंद्र नष्टस्थानी अथवा उत्तम स्थानीं असतां फळ देतो- तसेच चंद्र परत्वे संक्रांतीचें शुभाशुभ फळ घ्यावे

## पुण्यकाळ

पूर्वतोपिहिरविसंक्रमात्पुण्यकालघटिकास्तुषोडश॥
अर्धरात्रिसमयादनंतरं संक्रमोपरदिनं हि पुण्यदम्॥

टी०- सोळा घटिका पुण्यकाळ. संक्रांत दिवसास जाहली तर आणि मध्य रात्रीस जाहली तर दुसऱ्ये दिवशी पुण्यकाळ

## ग्रहण प्रकरण.

### चंद्रग्रहणाची प्रवृत्ति

भानोःपंचदशेऋक्षेचंद्रमायदितिष्ठति॥ पौर्णमा

स्यान्निशाशेषे चंद्रग्रहणमादिशेत् ॥

टी०- सूर्यनक्षत्रापासून पंधरावें चंद्रनक्षत्र आणि पौर्णिमा असून रात्रिशेष राहिली तर चंद्रग्रहण त्या रात्रीस येईल.

## सूर्यग्रहण.

माघोनं ग्रस्तनक्षत्रात्षोडशं यदि सूर्यभं ॥ अमावास्या दिवाशेषे सूर्यग्रहणमादिशेत् ॥

सर्व महिन्याचे अमावास्येस एक राशीस सूर्य आणि चंद्र येतात परंतु ग्रहणकाळीं येके नक्षत्रीं दिवसास येऊन अमावास्या असून दिवसशेष राहिला असतां सूर्यग्रहण संधि होत्ये. त्या दिवसीं चंद्रनक्षत्रापासून सूर्यनक्षत्रापावेतों मोजून आंतून अकरा काढून शेष सोळावें सूर्यनक्षत्र आलें म्हणजे सूर्यग्रहण होतें.

## राशिपरत्वें शुभाशुभ फळें.

त्रिषड्दशायोपगतं नराणां शुभप्रदं स्याद्ग्रहणं रवींदोः ॥ द्विसप्तनंदेषु च मध्यमं स्यात् शेषेष्वनिष्टं मुनयो वदंति ॥

सूर्य अथवा चंद्रग्रहण आपले राशीपासून जा राशीस होईल त्या राशी तीन, साहा, दाहा, त्या शुभ होय. आणि दोन, सात, नव, त्या मध्यम. आणि एक, चार, पांच, आठ, अकरा, बारा, त्या राशी नष्ट होत.

## दुसरा पक्ष.

ग्रासात्तृतीयोष्टमगश्चतुर्थस्तथायसंस्थः शुभदः स्वराशिः ॥ ग्रासाद्द्विः पंचनवर्तुमध्यस्ततोधमोक्ताश्च बुधैश्च शेषाः ॥

टी०- जा राशीस सूर्यग्रहण होईल त्या राशीपासून आपले राशीपावेतों ३, ८, ४, ११, हे उत्तम होत, आणि ५, ९, ६, हे मध्यम होत. आणि १, २, ७, १०, १२, कनिष्ठ. जा राशींत येईल त्याप्रमाणें फळ होय.

# प्रयोग
## रुतुप्रकरण
### शुभाशुभफळें

तिथिरेकगुणांप्रोक्तंनक्षत्रंचचतुर्गुणं॥ वारःषष्ठ
गुणोज्ञेयोमासश्चाष्टगुणःस्मृतः ॥१॥ वर्त्संश
तगुणंविद्याद्दर्शनंचततोधिकं॥ आर्तवेप्रथमेचै
त्रे वैधव्यंजायतेध्रुवम् ॥२॥

टी०— तिथीचा गुण एक. नक्षत्राचे गुण ४ वाराचे ६. मासाचे ८ वर्षाचे १००. आणि जी विटाळ पाहसे तिचे गुण सर्वांहून अधिक परंतु चांगला दिवस असला तर चागले गुण आणि दुष्ट असलात र वाईट गुण जाणावे

#### मासफळ.

वैशाखेधनवृद्धिःस्याज्ज्येष्ठेरोगान्विताभवेत्॥
आषाढेमृतवत्साचश्रावणेधनसंयुता ॥३॥भाद्र
पदुर्भगानारीआश्विनेधनधान्यभाक्॥ पौषेचपुं
श्चलीनारीमाघेपुत्रवतीभवेत्॥ ४ ॥ फाल्गुनेपु
त्रसंपन्नाज्ञेयंमासफलंबुधैः ॥ ५॥

टी०— चैत्र मासांत रुतुप्राप्त झाला असता वैधव्य. वैशाखमासीं धनवृद्धि ज्येष्ठमासी रोगप्राप्ती. आषाढमासीं मृतप्रजा श्रावण, लक्ष्मीदायक. भाद्रपदमासीं दरिद्री आश्विनमासी धनधान्ययुक्त. कार्तिकमासी निर्धन मार्गशीर्षमासी बहुप्रजा पौषमासींजार कर्मी माघमासीं पुत्रवती फाल्गुनमासीं पुत्रसपन्नाअसे जाणावें.

#### तिथिफल.

शुचिर्नारीप्रतिपदिद्वितीयायांतुदुःखिनी॥ तृती

यायांपुत्रवतीच्चतुर्थ्यांविधवाभवेत् ॥ ६ ॥ पंचम्यां
च्चैवसौभाग्यंषष्ठ्यांकार्यविनाशिनी ॥ सप्तम्यांरूप्र
जानारीच्चाष्टम्यांराक्षसीतथा ॥ ७ ॥ नवम्यांविधवाना
रीदशम्यांसौख्यभोगिनी ॥ एकादश्यांशुचिर्नारी
द्वादश्यांमरणंध्रुवं ॥ ८ ॥ त्रयोदश्यांशुभाप्रोक्ता
चतुर्दश्यांपरान्विता ॥ पौर्णिमास्यामगावास्यांशुभं
चाशुभमेवच्च ॥ ९ ॥

टी० – प्रतिपदेस ऋतु प्राप्त झाला असतां शुचि, द्वितीया दुःखदायक, तृतीया पुत्रवती, चतुर्थी विधवा, पंचमी सौभाग्यवती, षष्ठी कार्यनाशिनी, सप्तमी रूप्रजा प्रसूती, अष्टमी राक्षसी, नवमी विधवा, दशमी सौख्यभोगिनी, एकादशी शुचि, द्वादशी मरण, त्रयोदशी शुभा, चतुर्दशी जारिणी, पौर्णिमा शुभ, अमावास्या अशुभ असें जाणावें.

## ग्रहण आणि संक्रांति यांचें फल.

संक्रांत्यांग्रहणेचैववैरिणीच्चगताशुका ॥ ५ ॥

टी० – संक्रांतीवर ऋतुप्राप्त झाला असतां वैरिणी. ग्रहणावर झाला असतां विधवा असें जाणावें.

## वार फल.

आदित्येविधवानारीसोमेच्चैवमृतप्रजा ॥ मंगले
आत्मघातीस्याद्बुधेकन्याप्रसूःस्मृता ॥ १० ॥ गु
रुवारेसुतप्राप्तिःकन्यापुत्रयुताभृगौ ॥ मंदेच्चपुंश्च
लीनारीज्ञेयंवारफलंशुभं ॥ ११ ॥

टी० – रविवारीं ऋतुप्राप्त झाला असतां विधवा, सोमवारीं मृत प्रजा, भौमवारीं आत्मघातकी, बुधवारावर कन्याप्रसूती होईल, गुरुवारीं पुत्रप्रसूती, भृगुवारीं कन्यापुत्रप्रसूती, शनिवारीं जारकर्मी असें जाणावें.

## नक्षत्रफल

अश्विन्यांसुभगानारीभरण्यांविधवाभवेत्॥ कृत्ति
कायांचवंध्यास्याद्रोहिण्यांचारुभाषिणी ॥१२॥ मृ
गेदारिद्र्ययुक्तोक्ताचार्द्रायांक्रोधकारिणी॥पुनर्वसौ
पुत्रवतीपुष्येपुत्रधनेश्वरी॥१३॥ आश्लेषायांभवे
द्वंध्यामघायांचार्थसंयुता॥पूर्वायांचार्थयुक्ता हिचो
त्तरायांसतीतथा ॥१४॥ हस्तेपुत्रधनैर्युक्ताचित्रा
यामनुचारिणी॥स्वात्यान्यगर्भावयवाविशाखा
यांतुनिष्ठुरा॥१५॥मैत्रेचदुर्भगानारीज्येष्ठायांविध
वाभवेत्॥मूलेपतिव्रतासाध्वीपूर्वासौभाग्यभोगि
नी ॥१६॥उत्तरार्थवतीप्रोक्ताश्रवेसौभाग्यसंपदा॥
धनिष्ठायांशुभानारीशतेभद्रान्विताबुधैः॥१७॥
पूर्भेचोक्ताकामिनीतुउभेलक्ष्मीयुताशुभा॥रेव
त्यांपतिरिक्तातुज्ञेयंभानांफलंबुधैः॥१८॥

टी० — अश्विनी नक्षत्रीं ऋतुप्राप्त झाली असतां शुभ आणि भरणीवर विधवा, कृत्तिकावर वंध्या, रोहिणीवर प्रियभाषिणी, मृगावर दरिद्री, आर्द्रावर क्रोधी, पुनर्वसुवर पुत्रप्राप्ति, पुष्यावर पुत्र धनवती, आश्लेषावर वांझ, मघावर अर्थप्राप्ति, पूर्वावर अर्थयुक्त, उत्तरावर सती, हस्तावर पुत्र धन प्राप्ति, चित्रावर मनायोग्य चालणारी, स्वातीवर अन्यगर्भ, विशाखावर निष्ठुर, अनुराधावर दुर्भगा, ज्येष्ठावर विधवा, मूळावर पतिव्रता, पूर्वाषाढावर सौभा० उत्तराषाढावर लक्ष्मीदायक, श्रवणावर सौभाग्य, धनिष्ठावर शुभ, शततारकावर शुभा, पूर्वाभाद्रपदावर उत्तमभोग, उत्तराभाद्रपदावर, लक्ष्मीप्राप्ति, रेवतीवर पतीवाचून असेल असें जाणावें.

## योगफल.

आद्यतौं विधवानारी विष्कंभेचरजस्वला ॥ स्नेहः प्रीत्यातुदंपत्योरायुष्मांस्तु धनप्रदः ॥ ९ ॥ सौभाग्ये पुत्रयुक्तातुशोभने मंगलान्विता ॥ अतिगंडे तु विधवासुकर्मणितुशोभना ॥ १० ॥ धृतौसंपत्तियुक्ता चशूलेरोगयुताभवेत् ॥ गंडे दुःखान्वितानारीवृद्धौ पुत्रान्विताभवेत् ॥ ११ ॥ ध्रुवेतुशोभनानारी व्याघातेभर्तृघातकी ॥ हर्षणेहर्षयुक्तातुवज्रेचैवानपत्यता ॥ २२ ॥ सिद्धौ पुत्रान्वितानारीव्यतीपाते विभर्तृका ॥ मृतवत्साचवरीयाणे परिघेचाल्पजीविनी ॥ २३ ॥ शिवे पुत्रवतीनारीसिद्धे शीघ्रफलान्विता ॥ साध्येधर्मपरानारीशुभेशुभगुणान्विता ॥ २४ ॥ शुक्लेशुभकरानारीब्रह्मणिस्वपतौरता ॥ ऐंद्रेदेवररक्ताचवैधव्यंवैधृतौस्मृतं ॥ २५ ॥

टी०— विष्कंभयोगावरऋतुप्राप्त झाला असतां विधवा, आणि प्रीति योगावर स्नेह, आयुष्मानावर धनप्राप्ति, सौभाग्यावर पुत्रवती, शोभनावर मंगल, अतिगंडावर विधवा, सुकर्मावर शुभ, धृतीवर संपत्ति, शूलावर रोगी, गंडांवर दुःखान्विता, वृद्धीवर पुत्रप्राप्ति, ध्रुवावर शुभा, व्याघातावर पतिघातकी, हर्षणावर हर्षयुक्त, वज्रयोगावर वंध्या, सिद्धीवर पुत्रान्विता, व्यतिपातावर पतियांचून असेल, वरीयाण योगावर मृतप्रजा, परिघावर अल्पजीवी, शिवयोगावर पुत्रवती, सिद्धयोगावर शीघ्र फलप्राप्ति, साध्ययोगावर अधर्मी, शुभयोगावर गुणयुक्त, शुक्लयोगावर शुभकर्मी, ब्रह्मयोगावर स्वपतिरत, ऐंद्रावर दिराशी रत, वैधृतीवर विधवा, असें जाणावें.

## करणफल.

बवेप्रोक्तातुवंध्यास्त्रीबालवेपुत्रसंपदः॥ कौलवे
पुंश्चलीनारीतैतीलेचारुभाषिणी॥२६॥ गरेत्वगुणसं
पन्ना वणिजेपुत्रिणीस्मृता॥ विष्ट्यांचमृतवत्सा
चशकुनेकामपीडिता॥२७॥चतुष्पदेशुभानारी
नागेपुत्रवतीभवेत्॥ किंस्तुघ्नेव्यभिचारीतुकरणा
नांशुभंफलं॥२८॥

टी०— बवकरणावरऋतुप्राप्त झाला असतां वंध्या, बालवावर पुत्र
प्राप्ति, कौलवावर वेश्या, तैतिलावर प्रियभाषिणी, गरावर गुणसंपन्ना,
वणिजावर पुत्रिणी, विष्टीवर मृतवत्सा, शकुनीवर कामातुर, चतुष्प
दावर शुभा, नागावर पुत्रवती, किंस्तुघ्नावर जारिणी जाणावी

## राशिफल.

व्यभिचारीतुमेषेस्याद्वृषभेसुखभोगिनी॥मिथु
नेधनयुक्तोक्ता कर्कटे दुःखिताबुधैः॥२९॥ सिंहे
पुत्रवतीनारीकन्यायांमानिनीशुभा॥ तुलेविच
क्षणानारीवृश्चिकेव्यभिचारिणी॥३०॥ धनेप
तिव्रताज्ञेयामांसहीनाचनक्रके॥कुंभेधनवति
ज्ञेयामीनेचचपलाबुधैः ॥ ३१ ॥

टी०— मेषराशीवरऋतुप्राप्त झाला असतां जारिणी, वृषभावरसुखभो-
गिनी, मिथुनावरधनयुक्ता, कर्कावर दुःखी, सिंहावर पुत्रवती, कन्यावर
अभिमानी, तूळावर विचक्षणा, वृश्चिकावर जारिणी, धनावर पतिव्र
ता, मकरावर कृश, कुंभावर धनवती, मीनावरचपला, असे जाणावें

## होराफल.

सूर्येचव्याधिसंयुक्ताचांद्रेहोरेपतिव्रता॥कुजेहो

रेतुदौर्भाग्यंबुधेहोरेतुपुत्रिणी ॥ ३२ ॥ जीवेसर्वसमृद्धिःस्याद्भृगौसौभाग्यमेवच ॥ शनौसर्वविनाशाय होरकस्यफलंबुधैः ॥ ३३ ॥

| होरा | फळ | होरा | फळ |
|---|---|---|---|
| रवीच्याहोरा | व्याधी | गुरूचाहोरा | सर्वसमृद्धि |
| सोमाचाहोरा | पतिव्रता | शुक्राचाहोरा | सौभाग्य |
| भौमाचाहोरा | दुर्भगा | शनीच्याहोरा | सर्व विनाशिनी |
| बुधाचाहोरा | पुत्रिका | | |

## लग्नफळ

मेषलग्नेदरिद्राचवृषभेधनसंयुता ॥ कामिनीमिथुनेलग्नेकर्कटेपतिनाशिका ॥ ३४ ॥ सिंहेपुत्रप्रसूताचपतियुक्तास्त्रिलग्नके ॥ तुळेचैवांधतादायीवृश्चिकेदद्रुदुःखिनी ॥ ३५ ॥ धनलग्नेधनैश्वर्यंमकरेकर्कशाभवेत् ॥ कुंभेवंशक्षयश्चीचमीनेसर्वगुणान्विता ॥ ३६ ॥ ॥ ६ ॥ ॥ ६ ॥

टी०— प्रथम संक्रांति चालती असेल तेंच लग्न प्रथम जाणावें आणि मेष लग्नीं रुतु प्राप्त झाला असतां दरिद्रता. २ धनयुक्ता. ३ कामिनी. ४ पतिनाशकी. ५ पुत्रप्रसूता ६ पतियुक्ता. ७ अंधतादायी. ८ दद्रुदुःखिनी. ९ धनैश्वर्य. १० कर्कशा. ११ वंशक्षयनाशिनी. १२ गुणयुक्ता.

## ग्रहांचेंफळ

लग्नेराहुश्चसौरिश्चरविचंद्रौतथैवतु ॥ तदासाविधवानारीसर्वसौभाग्यवर्जिता ॥ ३७ ॥ ॥ ६ ॥

टी०— ज्या लग्नीं स्त्रियांस प्रथमऋतु प्राप्त होईल त्या लग्नीं राहु अथ-

या शनि. अथवा रवि चंद्र या ४ ग्रहांतून एक ग्रह जरी असला तर त्या स्त्रीस विधवात्व प्राप्त होईल.

## रक्तफल.

शोणितं बिंदुमात्रेण स्वैरिणी चाल्पशोणिता ॥ रक्ते रक्ते भवेत्पुत्रः कृष्णे चैव मृतप्रजा ॥ ३८ पिछली च भवेद्वंध्या काकवंध्या च पांडुरे ॥ पीते दुःश्चारणी ज्ञेया सुभगा गुंजसादृशे ॥ ३९ ॥ सिंदूरवर्णे रक्ते तु कन्यासंततिरेव च ॥

टी०—प्रथम ऋतु प्राप्त होतो त्या समयीं त्याचा अल्पवर्ण असला तर त्याचें फळ स्वैरिणी, तांबडा असल्यास पुत्रवती, काळ्यास मृतप्रजा, पिछलीस वांझ, पांढरा असल्यास काक वंध्या, पिंवळ्यास दुराचरणी, गुंजेसारिखा त्याचें फळ सुभगा, सिंदुरवर्णास कन्यासतती याप्रकारें फळश्रुती जाणावी

## काळफळ

पूर्वाह्णे सुभगा प्रोक्ता मध्यान्हे चैव निर्धना ॥ अपराण्हेः शुभा चैव सायान्हे सर्वभोगिनी ॥ ४० ॥ संध्ययोरुभयोर्वेश्या निशीथे विधवा भवेत् ॥ पूर्वरात्रे तथा वंध्या दुर्भगा सर्वसंधिषु ॥ ४१ ॥

टी०—प्रथम ऋतुप्राप्तः काळीं झाला असला तर सुभगा- मध्यान्हीं झाल्यास निर्धना, तिसरे प्रहरीचें फळ शुभ, सायंकाळीचें फळ सर्व भोगी, उभय संधीस वेश्या- मध्यरात्रीस विधवा पूर्वरात्रीस वांझ सर्व संधीस दुर्भगा असी फळे जाणावीं.

## नेसले वस्त्राचें फळ.

सुभगा श्वेतवस्त्रा च रोगिणी रक्तवस्त्रका ॥ नीलां

वरधरानारीविधवापुष्पवंतिका ॥ ४२ ॥ भोगिनीपी
तवस्त्राच्च मिश्रवस्त्रा वरप्रिया ॥ सूक्ष्मास्या सूक्ष्म
वस्त्राच्च दृढवस्त्रा पतिव्रता ॥ ४३ ॥ दुर्भगा जीर्णवस्त्रा
च सुभगा मध्यवाससा ॥ धूतवस्त्रा शुभा नारी मलि
नी मलिना भवेत् ॥ ४४ ॥

टी० - प्रथम रुतु प्राप्त पांढरे वस्त्रावर झाला तर सुभागा, तांबड्यावर रोगी, निळ्यावर विधवा, पुष्पवंतिका ह्मणजे ऋतुमती, पिंवळ्यावर भोगी, मिश्र वर्णावर पतिप्रिया, बारिक असल्यास शरीर कृश, बळकट वस्त्रावर पतिव्रता, जुनेफाटक्यावर दुर्भगा, मध्यमावर सुभगा, धुतले वस्त्रावर शुभ, मळकट वस्त्र असल्यास मलीन फळ जा०

## गर्भाधानासमुहूर्त.

रुतौतु प्रथमे कार्यं पुन्नक्षत्रे शुभे दिने ॥ मघामूलां
त्यपक्षांतं मुक्त्वा चंद्रबले सति ॥ ४५ ॥ ॥ ७ ॥

टी० - प्रथम ऋतु प्राप्त झाल्यावर पुन्नक्षत्रीं, शुभदिनीं, मघा, मूळ, रेवती, अमावास्या, पौर्णिमा वर्ज करून उक्त चंद्रबळ पाहून मुहूर्त योजावा.

## रुतूच्या षोडशरात्रीचें शुभाशुभ

ऋतुः स्वाभाविकः स्त्रीणां रात्रयः षोडश स्मृताः ॥ ता
सामाद्याश्चतस्त्रस्तु निंदितैकादशी च या ॥ ४९ ॥ त्रयो
दशी च शेषास्युः प्रशस्ता दश वासराः ॥ तस्मात्त्रिरा
त्रं चांडाळीं पुष्पितां परिवर्जयेत् ॥ ५० ॥ ॥ ७ ॥

टी० - रुतु प्राप्त झाल्यापासून स्वभावें करून स्त्रीचें रात्रीं सोळा रात्री असतो, त्यामध्यें प्रथम तीन रात्री चांडाळी पुष्पिता होय, आणि चौथी, अकरावी, तेरावी, त्या निंदित वर्ज करून शेष दाहा रात्री प्रशस्त होत.

रात्रौ चतुर्थ्यां पुत्रस्स्यादल्पायुर्धनवर्जितः ॥ पंचम्यां

पुत्रिणीनारी षष्ठ्यां पुत्रस्तुमध्यमः॥५१॥ सप्तम्याम
प्रजायोषिदष्टम्यामीश्वरःपुमान्॥ नवम्यांसुभगा
नारीदशम्यांप्रवरःसुतः॥५२॥ एकादश्यामधर्म्या
स्त्रीद्वादश्यांपुरुषोत्तमः॥ त्रयोदश्यांसुतापापावर्ण
संकरकारिणी॥५३॥ धर्मज्ञश्चकृतज्ञश्चआत्म
वेदीदृढव्रतः॥ प्रजायतेंचतुर्दश्यां पंचदश्यांपति
व्रता॥५४॥ आश्रयः सर्वभूतानां षोडश्यांजायते
पुमान्॥५५॥

टी०–४रात्रीस स्त्रीसंग केला असतां पुत्र अल्पायुषी धनवर्जित. ५रा
त्रीस कन्या, ६रात्रीस मध्यम पुत्र, ७ मुलगें होणार नाहीं, ८रा० पुत्र ई
श्वरभक्त, ९रात्रीस सौभाग्यवृद्धि, १०रा० गुणवान्पुत्र, ११रा० अध
र्मी पुत्र, १२रा०उत्तमपुरुष, १३रा० पापकर्मी कन्या, १४रा० धर्मकृतज्ञ
आणि निश्चयात्मक व्रत करणारा पुत्र, १५रा० पतिव्रता, १६रा० सर्व
भूताचा आश्रय करणारा पुत्र होईल

## तिथि आणि वार मुहूर्त.

षष्ठ्याष्टमी पंचदशीचतुर्थीचतुर्दशीमप्युभयत्र
हित्वा॥ शेषाःशुभास्युस्तिथयोनिषेकेवाराःशशां
कार्यसितेंदुजाश्च॥५५॥

षष्ठी, आणि अष्टमी, पौर्णिमा, अमावास्या, चतुर्थी, चतुर्दशी, त्या
तिथी वर्ज करून शेष तिथी शुभ आणि सोमवार, गुरुवार, शुक्रवार,
बुधवार हे वार शुभ जाणावे

## नक्षत्रें.

विष्णुप्रजेशरविमित्रसमीरपौष्णमूलोत्तरावरुण
भानिनिषेककार्ये॥पूज्यानिपुष्यवसुशीतकराश्विचित्रा

दिग्याश्च मध्यमफलाविफलास्युरन्ये ॥ ५६ ॥
श्रवण, रोहिणी, हस्त, अनुराधा, स्वाती, रेवती, मूळ, तिन्ही उत्तरा, शत तारका, हीं नक्षत्रें उत्तम होत, आणि पुष्य, धनिष्ठा, मृग, अश्विनी, चित्रा, पुनर्वसू, हीं मध्यम. अन्य राहिलीं तीं कनिष्ठ होत. ॥ मुहूर्तमार्तंड मतें ॥ ॥ वैधृति, संक्रांत, महापातादि दुष्टयोग, आणि श्राद्धांत पूर्व दिवस, जन्मनक्षत्रादि, आणि संधि दिवस रात्र नक्षत्र, इत्यादि वर्ज करून जा लग्नीं विषमस्थानीं राशी नवमांशी उंचीचा बृहस्पति अथवा सूर्य चंद्र असेल तें लग्न घ्यावें म्हणजे पुत्र प्राप्ति आणि हेच ग्रह समराशीस असले तरीं कन्या प्राप्ति होईल.

## प्रथम गर्भिणीस्त्रीचे पुंसवनादिक संस्कार.

मूलादित्रितये करे श्रवणके भाद्रद्वयाद्रीत्रये रेवत्यां
मृगपंचके दिनकरे भौमे न रिक्तातिथौ ॥ नेत्रे मास्यथ
वाग्निमासि धनुषि स्त्री मीनयोश्च स्थिरे लग्ने पुंसवनं
तथैव शुभदं सीमंतकर्माष्टमे ॥ ५७ ॥ ॥ ७ ॥

* मृगांतपंचकं मृगपंचकं

टी० — मूळ, पूर्वाषाढा, उत्तराषाढा, हस्त, श्रवण, पूर्वाभाद्रपदा, उत्तराभाद्रपदा, आर्द्रा, पुनर्वसू, पुष्य, रेवती, अश्विनी, भरणी, कृत्तिका, रोहिणी, मृग, आणि रविवार, भौमवार हे उक्त. आणि रिक्तातिथी वर्ज करून गर्भधारण झाल्या पासून द्वितीय अथवा तृतीय मास आणि धन लग्न, कन्या, मीन, हीं स्थीर लग्नें पुंसवनास उक्त होत आणि हींच लग्नें सीमंत कर्मास अष्टममासीं घ्यावयास उक्त होत.

## वारफळें.

मृत्युश्च सौरे त्वनुहानिरिंदोः प्रजामृतिः पुंसवने बुधस्य ॥
काकीत्व वंध्या भवतीह शुक्रे स्त्रीपुत्रलाभो रविभौमजीवैः ॥ ८ ॥

शनिवारीं पुंसवन केलें असता मृत्यु. इंदुवारी शरीराचानाश. बुधवारीं शिशून रेल शुक्रवारीं काकवंध्या एकवारप्रसूति, रवि, भौम, गुरुवारी, पुत्रलाभ होई ल परंतु चंद्र अनुकूळ पाहून दुष्टयोगादिक वर्ज करून वरसांगितले उक्त नक्षत्रा दिक शुभदिवशीं पुंसवन हा० गर्भाची पुत्राकृति व्हावी ह्मणोन संस्कार करि तात. अनवलोभनस्याप्ययमेवकालः॥ ॥ याचमुहूर्तावर गर्भाची स्थि रता असावी ह्मणून अनवलोभनउक्त होय.

## अन्यमत

## सीमंतोन्नयन आणि विष्णुबलि.

चतुर्थषष्ठाष्टममासभाजिसौरेणगर्भेप्रथमंविधेयं॥ सीमंतकर्मद्विजभामिनीनांमासेष्टमेविष्णुबलिंचकुर्यात्॥ ५९॥ ॥ ७॥ ॥

टी० – प्रथम गर्भ धारण झाल्या पासून चवथा, साहावा, आठवा, असे स ममास सौरमाने करून घ्यावे सीमंत कर्म ब्राह्मण स्त्रियांस उक्त आणिवि ष्णु बलिह्या आठवे महिन्यात उक्त आहे

सीमंतेतिष्यहस्तादितिहरिशशिभृत्पौष्णधिष्ण्युत्तराख्यापक्षच्छिद्राचरिक्तापितृतिथिमपहायापरास्त्युः प्रशस्ताः॥ ६० ॥ ॥ ७॥ ॥

टी०– सीमंत कर्मास नक्षत्रे पुष्य, हस्त, पुनर्वसु, श्रवण, मृग, रेवती, रोहिणी, तिन्ही उत्तरा शुभ होत पक्षछिद्रा, आणि रिक्ता तिथि पितृ तिथि वर्ज करून शेष राहिल्यास शुभजाणाव्या

## पक्षछिद्रातिथी

चतुर्दशीचतुर्थीचअष्टमीनवमीतथा॥ षष्ठीचद्वादशीचैवपक्षछिद्राह्वयास्मृताः॥ ६१॥ क्रमादेतासुतिथिषुवर्जनीयाश्चनाडिका॥ भूताष्टमनुतत्वांक

दशशेषास्तुशोभनाः ॥ ६२ ॥ ॥ ७ ॥

चतुर्दशी १४ घटिका प्रथम वर्जाव्या, आणि चतुर्थीच्या आठ घट० अष्टमीच्या १४, नवमीच्या २५, षष्ठीच्या ९, द्वादशीच्या १०, अशा टाकून उक्त होय.

## गर्भिणीधर्म

भून्यांच्चवोच्चनीचायामारोहणवरोहणे ॥ नदीप्रतरणंचैवशकटारोहणंतथा ॥ ६३ ॥ उग्रौषधंतथाक्षारं मैथुनंभारवाहनं ॥ कृतेपुंसवनेचैवगर्भिणीपरिवर्जयेत् ॥ ६४ ॥

पुंसवन झाल्यावर गर्भिणी स्त्रीनें उंच नीच भूमीवर चढणें, उतरणें, फारच्या लणें, झाडावर चढणें, वाहत्या नदींत जाणें, गाड्यावर बसणें, तीक्ष्ण औषधी घेणें, खारट पदार्थ खाणें, मैथुन करणें, ओझें घेणें, हीं वर्जावीं.

## गर्भिणीप्रश्न.

नामाक्षराणित्रिगुणीकृतानितुरंगदेशेतिथिमिश्रितानि ॥ अष्टोचभागंलभतेचशेषंसमेचकन्याविषमेचपुत्रः ॥ ६५ ॥

गर्भिणीचीं नामाक्षरें त्रिगुणित करावीं त्यांत घोड्याचीं नामाक्षरें व देशाचीं अक्षरें एकत्र करून चालती तीथ आंत मिळवून आठांनीं भागावें शेष सम अंक उरलेतर कन्या. विषम उरलें तर पुत्र होईल.

## प्रसूतिस्थानींप्रवेशासनक्षत्रें.

रोहिण्यैंदवपौष्णेषुस्वातीवारुणयोरपि ॥ पुनर्वसौपुष्यहस्तधनिष्ठास्युत्तरासुच ॥ मैत्रत्वाष्ट्रेतथाश्विन्यांसूतिकागारवेशनं ॥ प्रसूतिसंभवेकालेसद्यएवप्रवेशयेत् ॥

टी॰ – रोहिणी, मृग, रेवती, स्वाती, शततारका, पुनर्वसु, पुष्य, हस्त, धनिष्ठा, तिन्ही उत्तरा, अनुराधा, चित्रा, अश्विनी, हीं नक्षत्रें प्रवेशास उक्त. प्रसूति संभव प्राप्त झाला ह्मणजे तत्कालीच प्रवेश करावा, नक्षत्र विचार करूनये

## प्रसूतिसमयीं खोलीतील पदार्थ सांगा

## चयाचा प्रश्न.

मीनेमेषेस्त्रियौद्वेचचतस्रोवृषकुंभयोः॥ तुलाकन्यक योःसप्तबाणाख्याधनकर्कयोः॥ अन्यलग्नेभवंस्तिस्र एवंज्ञेयंविचक्षणैः॥ यथाराहुस्तथाशय्याभौमेखट्वांग भंगता॥ रविस्थानेभवेद्दीप शनिस्थानेतुनालकं॥

मीन अथवा मेषाच्या लग्नी प्रसूत झाली तर तिचेजवळ दोन स्त्रिया आहेत, वृषभ, कुंभ असले तर ४ स्त्रिया, तूळ कन्या लग्न अस॰ तर ७ स्त्रिया, ध न, कर्क, असल्यास ५ स्त्रिया, अन्य लग्नीं ३ स्त्रिया जाण्याव्या लग्नकुंडली पाहून ज्या दिशेस राहू त्या स्थानी शय्या, भौम लग्नी असला तर खट्वा मोडकी, ज्या स्थानी रवि असेल त्या स्थानीं दीप. ज्या स्थानीं शनि असेल त्या स्थानी मुलाचे नाळ असे जाणावें

## तिथिगंडांत

पूर्णानंदाख्ययोस्तिथ्योः संधिनाडीद्वयंतथा॥ गंडां तंमृत्युदंजन्मयात्रोद्वाहव्रतादिषु॥

टी॰— पौर्णिमेची अंत्य घटिका आणि प्रतिपदेची आद्य घटिका अशी दोहों- ची संधी याचक्रमाने पंचमी, षष्ठी दशमी, एकादशी, अशा संधींचा घटिका दोन दोन वर्जाव्या त्यास गंडांत म्हणावे.

## लग्नगंडांत

कुलीरसिंहयोःकीटचापयोर्मीनमेषयोः॥ गडांतमं तरालंस्याद्धटिकार्धमृतिप्रदम्॥

टी०- कर्क, सिंह, या दोहों लग्नांची संधि अर्ध अर्ध घ० याच क्रमानें वृश्चिक आणि धन, मीन, मेष, यांची संधि वर्ज करावी ती एक घटिका मृत्युप्रद जाणावी.

## नक्षत्रगंडांत

पौष्णाश्विन्योः सार्पपित्र्यर्क्षयोश्चयच्चज्येष्ठामूलयोरंतरालं ॥ तद्गंडांतंस्याच्चतुर्नाडिकंहियात्राजन्मोद्वाहकालेष्वनिष्टम् ॥

टी०-रेवती. अश्विनी यांच्या दोनदोन घटिका संधीच्या.याच क्रमाने आश्लेषा,मघा, ज्येष्ठा, मूळ, अशा संधीच्या चार घटिका वर्जाव्या. असें हें त्रिविधगंडांत ल्म० तिथी लग्न नक्षत्र अशीं तीन प्रकरणें वर सांगितलीं आहेत तीं यात्रेस जाण्यास,जन्मकाळीं आणि विवाहास वर्जावीं.

## जातक

### जन्मकाळाचींशुभाशुभफळेंगंडांत

अश्विनीमघमूलानांपूर्वार्धेबाध्यतेपिता॥पूषादिशक्रपश्चार्धेजननीबाध्यतेशिशोः॥सर्वेषांगंडजातानांपरित्यागोविधीयते॥वर्जयेद्दर्शनंशावंतच्चषाण्मासिकंभवेत्॥१॥

टी०-अश्विनी. मघा. मूळ. या नक्षत्रांचे पूर्वार्धीं जन्म झालें तर बापास वाईट, आणि रेवती, ज्येष्ठा, या दोन नक्षत्रांचे उत्तरार्धीं जन्म झाल्यास मातेस वाईट. आणि गंडांतांत जन्म झाल्यास मुलाचा त्याग करावा. अथवा सहा महिनें तोंड पाहूं नये.

## कृष्णचतुर्दशीचेंफळ

कृष्णपक्षेचतुर्दश्यांप्रसूतेःषड्विधंफलं॥चतुर्दशींचषड्भागांकुर्यादादौशुभंस्मृतं॥२॥ द्वितीयेपितरं

हंतितृतीयेमातरंतथा॥चतुर्थेमातुलंहंतिपंचमेवंश
नाशनं॥३॥षष्ठेचधनहानिस्यादात्मनोवंशनाशनं॥
कृष्णाचतुर्दशीस जन्म झाल्यास तिथीचे साहाभाग करावे त्यांचीं फळे, प्रथम
भाग १० घटिकाचा शुभ, द्वितीय पित्यास वाईट, तृतीय मातेस, चतुर्थ मातु-
ळास, पांचवा वंशास, साहावा धन हानि, आत्म वंश नाशक असे जाणावे

## अमावास्येचें फळ

सिनीवाल्यांप्रसूताश्चदासीभार्यापशुस्तथा॥गजाश्च
महिषीचैवशक्रस्यापिश्रियंहरेत्॥४॥कुहूप्रसूतिरि
स्त्रीणांसर्वदोषकरीस्मृता॥यस्यप्रसूतिरेतेषांतस्यायुर्ध
ननाशनं॥५॥सर्वगंडसमस्तत्रदोषस्तुप्रबलोभवेत्॥६
टी०— चतुर्दशी युक्त अमावास्येस दासी, अथवा भार्या, गाय, हत्तीण, घोडी,
हैस, ही जर प्रसूत झाली असतां स्वामीची संपत्ती जाईल अमावास्ये
स प्रसूत झाली असतां पुष्कळ दोष आणि स्वामीच्या आयुष्याचा नाश व
धनाचा नाश आणि गंडांताचा प्रसूत काळीं बहुत दोष

## दिन क्षयादि

दिनक्षयेव्यतीपातेव्याघातेविष्टिवैधृतौ॥शूलेगंडे
तिगंडेचपरिघेयमघंटके॥७॥कालगंडेमृत्युयोगेद
ग्धयोगेसुदारुणे॥ तस्मिन्गंडदिनेप्राप्तेप्रसूतिर्यदि
जायते॥८॥अतिदोषकरीप्रोक्तातत्रपापयुतासती॥
टी०— दिनक्षय, व्यतीपात, व्याघात, कल्याणी, वैधृति, शूळ, गंड, अतिगं
ड, परिघार्ध, यम घंट, काळगंड, मृत्युयोग, दग्धयोग, आणि दारुणयोग, यांवर
जन्म जाहले तर मोठा दोष आणि ती स्त्री पापयुक्त असें जाणावें

## ज्येष्ठानक्षत्राचें फळ

ज्येष्ठाद्यौजननीमाता द्वितीयेजननीपिता॥तृतीयेज

ननीभ्रातास्वयंमाताचतुर्थके ॥ ९ ॥ आत्मानं पंच मेहंतिषष्ठे गोत्रक्षयोभवेत् ॥ सप्तमेचोभयकुलंज्ये ष्ठभ्रातरमष्टमे ॥ १० ॥ नवमेश्वशुरंहंतिसर्वंहंतिद शांशके ॥ ११ ॥

टी० - ज्येष्ठानक्षत्रावर जन्मझालें असल्यास त्याचे भाग साहा घटिका प्रमाणें दाहाभाग करावे, त्यांचें फळ असें, प्रथम भाग मातेचे आईस, दुसराभाग आईचे बापास, ३ भाग मामास, ४ भाग मातेस, ५ भाग मुलास, ६ भाग गोत्रजांस, ७ भाग आईचे बापाचा कुळ नाशक, ८ भाग वडीलभावांस, ९ भाग श्वशुरास, १० भाग सर्वांस वाईट असें जाणावें.

## मूळ नक्षत्राचें फळ

मूलंस्तंभंत्वक्शाखापत्रंपुष्पंफलंशिखा ॥ वेदाश्वमुनयश्चैवदिशश्चवसवस्तथा ॥ १३ ॥ नंदाबाणरसारुद्रा मूलभेदाःप्रकीर्तिताः ॥ मूलेमूलविनाशायस्तंभेहानि र्धनक्षयः ॥ त्वचिभ्रातृविनाशायशाखामातुर्विनाश कृत् ॥ १४ ॥ पत्रेसपरिवारःस्यात्पुष्पेषुनृपवल्लभः ॥ फलेषुलभतेराज्यंशिखायामल्पजीवितं ॥ १५ ॥ ॥

टी० - मूळ नक्षत्रास मूळ वृक्ष असें नाम आहे, याच्या घटी ६० त्याचीं स्थानें असीं. प्रथम ४ घटिका वृक्षाचें मूळ त्यांत जन्म जाहलें असतां नाश, द्वितीय भाग ७ घ० स्तंभ हानि आणि धनाचा नाश, तिसरा भाग १० घ० साल भावास वाईट, चवथा भाग ८ घ० वृक्षाच्या रवांद्या मातेस वाईट, पांचवा भाग ९ घ० वृ० पत्रें परिवारास वाईट, साहावा भाग ५ घ० वृ० पुष्पें राजमंत्री, सातवा भाग ६ घ० वृ० फळ राज्यप्राप्ति, आठवा भाग ११ घ० वृ० शेंड्यांत जन्म जाहलें असतां अल्पायुषी असें साठी घटकांचें मान जाणावें.

## जन्मकाळीं मूळनक्षत्र कोणते लोकीं आहे तें पाहावयाचीं लग्नें.

वृषादिसिंहेषु घटेच मूलंदिविस्थितयुग्मतुलांगनांसे ॥पातालगंमेषधनुःकुलीरनक्रेषुमर्त्येषतिसंस्मरंति॥१६

टी०– वृषभ, वृश्चिक, सिंह, कुंभ, याचोहोंतून एखादे लग्नीं जन्म जाहलें असतां त्या दिवशी मूळनक्षत्र स्वर्गीं आहे, त्याचें फळ राज्यप्राप्ति. आणि मिथुन, तूळ, कन्या, मीन, या लग्नींजन्म जाहले असतां पाताळीं आहे, त्या लग्नाचे फळ धन प्राप्ति, आणि मेष, धन, कर्क, मकर, या लग्नीं जन्म जाहले तर मृत्यु लोकीं आहे त्याचें फळ सर्व कुटुंबास वाईट असें बारा लग्नाचे फळ वेगळे जाणावें

## आश्लेषानक्षत्राचा नराकार वृक्ष.

मूर्द्धास्यनेत्रगलकांसयुगंचबाहुहृज्जानुगुह्यपदमित्यहिदेहभागः॥ बाणाद्रिनेत्रहुतभुक्श्रुतिनागरुद्रषण्नंदपंचशिरसःक्रमशस्तुनाड्यः॥१७॥ ॥५॥

राज्यंपितृक्षयोमातृनाशःकामक्रियारतिः॥ पितृभक्तोबलीस्वघ्नस्त्यागीभोगीधनीक्रमात्॥१८॥ ॥७

टी०– आश्लेषा नक्षत्राच्या घटिकांची नराकार स्थाने प्रथम ५ घटिका मस्तक, त्याचे फळ राज्य प्राप्ति, द्वितीय ७ घ० मुख हे बापास वाईट, तिसरा विभाग २ घ० नेत्र हा मातेस वाईट, चवथा वि० ३ घ० गळा, त्याचें फळ स्त्रीरत. पांचवा विभाग ४ घ० दोन्ही खांदे, हा पितृभक्त, साहावा वि० ८ घ० दोन्ही बाहू, फ० बळकट, सातवा वि० ११ घ० हृदय, आत्मघाती, आठवा वि० ६ घ० दोन्ही ढोमे, त्यागी, नववा वि० ९ घ० गुह्य भोगी, दाहवा विभाग ५ घ० दोन्ही पाय, धनवान्, जा भागांत जन्म होईल त्याचें फळ स्थान परत्वे घ्यावे.

## जन्मकाळींग्रहज्जसे पडतीलत्यां
## चीं फळें.

तनुस्थान॥ ॥लग्नस्थितो दिनकरः कुरुतेंगपीडांपृ
थ्वीसुतो वितनुते रुधिरप्रकोपं॥ छायासुतः प्रकुरुते
बहुदुःखभाजंजीवेंदुभार्गवबुधाःसुखकांतिदाःस्युः॥१॥
धनस्थान॥ दुःखावहा धनविनाश कराःप्रदिष्टावित्तोस्थि
तारविशनैश्चरभूमिपुत्राः॥ चंद्रोबुधः सुरगुरुर्भृगुनंद
नोवानानाविधंधनचयंकुरुते धनस्थाः॥२॥ ॥सहज
स्थान॥ ॥भानुःकरोतिविरुजंरजनीकरोपिकीर्त्यायुतं
क्षितिसुतः प्रचुरप्रकोपं॥ ऋद्धिंबुधः सुधिषणंसु
विनीतवेषंस्त्रीणांप्रियंगुरुकवीरविजस्तृतीये॥३॥
॥सुहृत्स्थान॥ ॥आदित्यभौमशनयः सुखवर्जि
तांगंकुर्वंतिजन्मनिनरंसुचिरंचतुर्थे॥ सोमोबुधःसु
रगुरुर्भृगुनंदनोवासौख्यान्वितंनृपकर्मरतप्रधानं
॥४॥ ॥सुतस्थान॥ ॥पुत्रेरविः प्रचुरकोपयुतंबुध
श्चस्वल्पात्मजंशनिधरातनुजावपुत्रं॥ शुक्रेंदुदेवगु
रवः सुतधामसंस्थाः कुर्वंतिपुत्रबहुलंसुरुचिनंसुरू
पं॥५॥ ॥रिपुस्थान॥ ॥मार्तंडभूमितनुजोहत
शत्रुपक्षंपंगुर्नरंरिपुगृहे घ्नतिपूजनीयं॥ काव्येंदुजो
मतिविहीनमनल्परोगंजीवः करोति विकलंमरणं
शशांकः॥६॥ जायास्थान॥ ॥तिग्मांशुभौमरवि
जाः किलसप्तमस्थाजायांकुकर्मनिरतांतनुसंततिंच
॥जीवेंदुभार्गवबुधाबहुपुत्रयुक्तांरूपान्वितांजनमनो
हररूपशीलां॥७॥ ॥मृत्युस्थान॥ ॥सर्वेग्रहादिन

करमसुखानितांतंमृत्युस्थितायिननुतेकिलदुष्टबुद्धि
म्॥शस्त्राभिघानपरिपीडितगात्रयष्टिंसौख्यैर्विहीन
मतिरोगगणैरुपेतं॥८॥ ॥धर्मस्थान॥ ॥धर्म
स्थितारविशनैश्वरभूमिपुत्राःकुर्वतिधर्मरहितंविम
तिंकुशीलं॥चंद्रोबुधोभृगुसुतःसुरराजमंत्रीधर्मक्रि
यासुनिरतंकुरुतेमनुष्यं॥९॥ ॥कर्मस्थान॥आदि
त्यभौमशनयःकिलकर्मसंस्थाःकुर्युर्नरंबहुकुकर्मर
तंकुपुत्रम्॥चंद्रःसुकीर्तिमुशनाबहुवित्तयुक्तंरूपान्वि
तबुधगुरूशुभकर्मभाजम्॥१०॥ ॥लाभस्थान॥ ॥
लाभस्थितोदिनकरोनृपलाभयुक्तंतारापतिर्बहुधनं
क्षितिजःक्षितीशम्॥सौम्योविवेकसुभगंचधनायु
षीज्यशुक्रःकरोतिसगुणंरविजःसुकीर्ति॥११॥ ॥
व्ययस्थान॥ ॥सूर्यःकरोतिपुरुषंव्ययगोविशी
लंकाणंशशीक्षितिसुतोबहुपापभाजं॥चंद्रांग
जोगतधनंधिषणःसुशांगंशुक्रोबहुव्ययकरंरवि
जःसुतीव्रम्॥१२॥ ॥ ५॥ ॥५॥ ॥
राहुकेतुफलंसर्वमंदवत्कथितंबुधैः॥ ५॥ ॥

पुरुषजातककोष्टक

जन्मलग्नीत न्वा दिद्वादशभावस्थानीं जेजे ग्रह
येतील त्यांचीं तीं पृथक् पृथक् फळें जाणावयाचें
कोष्टक आणि राहुकेतु यांची फळें शनिवत् आ
हेत॥

| संख्या | स्थानें | रवि. | चंद्र | मंगळ | बुध | गुरु | शुक्र | शनिराहु केतु |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | तनु | अंगपीडा | कांति आणि सुख | रक्त कोप | कांति आणि सुख | कांति आणि सुख | कांति आणि सुख | अति दुःखदायक |
| २ | धन | अति दुःख व धनाचा नाश | संपत्ति अत्यंत प्राप्ति | दुःखप्राप्त धनाचा नाश | नानाप्रकारची संपत्ति प्राप्त | नानाप्रकारची संपत्ति प्राप्त | नानाप्रकारची संपत्ति प्राप्त | अति दुःखप्राप्त धनाचा नाश |
| ३ | सहज | निरोगी असेल | कीर्ति मिळवील | कोपयुक्त असेल | समृद्धि | सुबुद्धिवान् | नाना वेष धारण करील | स्त्रियांस प्रिय होईल |
| ४ | सुहृत् | शरीरास पीडा बहुत होईल. | सुख भोगील | शरीरास पीडा बहुत होईल. | सुख भोगील | सुख भोगील | सुख भोगील | शरीरास पीडा बहुत होईल |
| ५ | सुत | मोठा रागीट होईल | बहुत पुत्र होतील | संतती होणार नाहीं | अल्प पुत्र संतती होईल | बहुत पुत्र प्राप्ति | बहुत पुत्र होतील | संततीच होणार नाहीं |
| ६ | रिपु | शत्रूचा नाश करील. | मरण पावेल | शत्रूचा नाश करील | बुद्धिहीन, बहुत रोग असतील | शरीर विकळित असेल | बुद्धिहीन व रोग बहुत असेल | शत्रूचे गृहीं पूज्य होईल |
| ७ | जाया | पापकी दुष्टकर्मी संतती अल्प | स्त्री रूपवान् व गुणवान् व पुत्र गुणवान् | स्त्री दुष्टकर्मी व संतती अल्प | स्त्री रूपवान् आणि मनहरण करणारी व बहुपुत्र होतील असे चांगले स्वभावाची प्राप्त होईल | | | स्त्री दुष्टकर्मी आणि संतति थोडी उत्पन्न. |
| ८ | मृत्यु | सर्व ग्रहांचें फळ एकच आहे दुष्टबुद्धि व शस्त्रघातें करून शरीरास पीडा होतील, सौख्य रहित असेल आणि रोगी असेल जो ग्रह यास्थानीं असेल त्याणी घ्यावें. | | | | | | |
| ९ | धर्म | अधर्मी दुष्टमती दुष्टशील | धार्मिक होईल | अधर्मी दुष्टमति. दुष्टशील | धर्म निरंतर करील | धर्म निरंतर करील. | | अधर्मी बुद्धिहीन दुष्ट बुद्धी होईल. |
| १० | कर्म | अत्यंत दुष्टकर्मी व कुपुत्रवान् | अत्यंत कीर्तिवान् होईल. | दुष्टकर्मी व कुबुद्धी | कीर्ति चांगली | शुभकर्म करील | संपत्तिवान् | फार दुष्टकर्मी व कुपुत्र होतील. |
| ११ | आय | राजाशीं समागम करील | धनपुष्कळ मिळवील | पृथ्वीचे राजापासून लाभ होईल | विवेकयुक्त आणि सुंदर अ० | धन आणि आयुष्य वृद्धि | गुणवान् असेल | चांगली कीर्ति मिळवील. |
| १२ | व्यय | दुष्टशील | काणा होईल | पापकर्म आचरेल | गतधर्मी असेल | कृशांग असेल | व्याधिस्थ | तीव्रता असेल. |

मुलाचेजन्मलग्नासमृत्युकारकग्रह.

चंद्राष्टमंच धरणीसुतसप्तमंचराहुर्नवंचशनिज
न्मगुरुस्तृतीये ॥ अर्कस्तु पंचभृगुषष्ठबुधश्चतुर्थे
जातोनजीवतिनरः प्रवदंतिसंतः ॥

टी०– जन्म लग्नापासून चंद्र अष्टमस्थानीं, भौम ७ स्थानीं, राहु ९ स्थानी, शनिजन्म लग्नी, गुरु ३ स्थानीं, सूर्य ५ स्थानी, शुक्र ६ स्थानी, बुध ४ स्थानी असे ग्रह असले तर मूल वांचणार नाहीं.

जन्मलग्नींमुलाचेबापकोसमृत्युकारक

षष्ठेचभुवने भौमोराहुः सप्तमसंभवः ॥ अष्टमे
चयदासौरिस्तस्यभार्यानजीवति ॥

टी०– जन्म लग्नापासून षष्ठस्थानीं भौम, राहु ७ स्थानीं, शनि ८ स्थानीं, असायोग ग्रहांचा असल्यास त्या मुलाची बापको वांचणारनाहीं.

चांगलेपराक्रमाचेग्रह

मूर्तौशुक्रबुधोयस्यकेंद्रेचैवबृहस्पतिः ॥ दशमोंगा
रकश्चैवसज्ञेयः कुलदीपकः ॥ ॥ ॥ ५ ॥

टी०– जन्मलग्नीं शुक्र, बुध, आणि केंद्र (म्ह० प्रथम, चतुर्थ, सप्तम, दशम, यांस म्हणतात) या स्थानीं बृहस्पति दशमस्थानींभौम, असल्यास तो मूल कुलदीपक असे जाणावे.

पराक्रमीग्रह

नैवशुक्रोबुधोनैवनास्तिकेंद्रेबृहस्पतिः ॥ दशमों
गारकोनैवजातकं किंकरिष्यति ॥

टी०– लग्नी शुक्र बुध अथवा केंद्री बृहस्पति किंवा दशम स्थानीं अंगारक यांतून कोणी ग्रह नंसला तर जन्म होऊन व्यर्थ जाणावें.

## जातिभ्रंशकारक.

धनस्थानेयदासौरिःसैंहिकेयोधरात्मजः॥शुक्रोगु
रुःसप्तमेच्चत्वष्टमोरविश्चंद्रकौ॥ब्रह्मपुत्रेपदेवापि
वेश्यारक्तश्चसदारतिः॥प्राप्तेविंशतिमेवर्षेम्लेंछो
भवतिनान्यथा॥

टी०- धनस्थानीं शनि, राहु, मंगळ, अथवा सप्तमस्थानीं शुक्र, गुरु, अष्टम स्थानीं रवि, चंद्र, असे ग्रह असतां ब्राह्मण जन्म असला तथापि वेश्येसीं रत असेल आणि वीस वर्षांचा आहला ह्मणजे म्लेंछ होईल.

## मातापितरांसनाशक

षष्ठेच्चद्वादशेराशौयदापापग्रहोभवेत्॥तदामातृ
भयंविंद्याच्चतुर्थेदशमेपितुः॥

टी०- षष्ठस्थानीं अथवा द्वादशस्थानीं पाप ग्रह असला तर मातेस वाईट. किंवा चतुर्थ दशमस्थानीं असला तर पित्यास वाईट.

## नाशिवंतग्रह

अर्कोराहुःकुजःसौरिर्लग्नेतिष्ठतिपंचमे॥पितरंमा
तरंहंतिभ्रातरंचशिशूंक्रमात्॥

टी०-जन्मलग्नापासून पंचमस्थानीं ग्रह आले तर त्यांचीं फळें. रवि आल्यास पित्यास वाईट, राहु मातेस, भौम भ्रात्यास, शनि आल्यास मुलास मृत्यु कारक असें क्रमें करून जाणावें.

लग्नस्थानेयदासौरिःषष्ठोभवतिचंद्रमाः॥कुजस्तुस
प्तमस्थानेपितातस्यनजीवति॥

टी०-जन्मलग्नीं शनि. षष्ठ स्थानीं चंद्र. सप्तमस्थानीं मंगळ. असे असले तर पित्यास मृत्युकारक.

पातालस्थोयदाराहुश्चेंदुःषष्ठाष्टमेपिच॥पापदृष्टो

पिशोपेणसद्यःप्राणहरःशिशोः ॥

टी०—जन्मलग्नापासून सप्तमस्थानीं राहु. षष्ठ अथवा अष्टम स्थानीं चंद्र आणि शेष ग्रहांची पाप दृष्टि असल्यास जन्म होतांच मृत्यु जाणावा

जन्मलग्नेयदाराहुःषष्ठोभवतिचंद्रमाः ॥ जातोमृत्युमवाप्नोतिकुदृष्ट्यात्वपमृत्युना ॥

टी०—जन्मलग्नीं राहु षष्ठम स्थानीं चंद्रमा असें असल्यास जन्महोतांचमृत्यु, आणि जन्मलग्नावर कुदृष्टि असली तर अपमृत्यु

जन्मलग्नेयदाभौमश्चाष्टमेचबृहस्पतिः ॥ वर्षेच द्वादशेमृत्युर्यदिरक्षतिशंकरः ॥

टी०—जन्मलग्नीं मंगळ अष्टमस्थानीं बृहस्पति असे असतेनर बारावे वर्षी शंकर रक्षित असला तथापि मृत्यु प्राप्त होतो.

शनिक्षेत्रेयदासूर्यो भानुक्षेत्रेयदाशनिः ॥ वर्षेच द्वादशेमृत्युर्देवैरक्षितायदि ॥

टी०—शनीचे गृहात सूर्य अथवा सूर्याचे गृहांत शनि असे जन्मकाळीं असल्यास देवरक्षित असतांही बारावे वर्षी मृत्यु होतो.

षष्ठोष्टमःस्तथामूर्तौजन्मकालेयदाबुधः ॥ चतुर्थवर्षेमृत्युःस्याद्यदिरक्षतिशंकरः ॥

टी०— षष्ठ अष्टम अथवा जन्मलग्नीं बुध असल्यानर चवथे वर्षी शंकर रक्षित असतांही मृत्यु होतो.

भौमक्षेत्रेयदाजीवःषष्ठाष्टकश्चचंद्रमाः ॥ वर्षेष्टमेपिमृत्युर्वैईश्वरोरक्षितायदि ॥

टी०—मंगळाचे गृहांत बृहस्पति, आणि षष्ठम अथवा अष्टम स्थानीं चंद्रमा असल्या तर ईश्वर रक्षित असतां आठवे वर्षी मृत्यु जाणावा.

दशमोपियदाराहुर्जन्मलग्नेयदाभवेत् ॥ वर्षेतुषो

डशेज्ञेयोबुधैर्मृत्युर्नरस्यच ॥

टी० – जन्म लग्नापासून दशमस्थानीं अथवा जन्म लग्नीं राहु असला तरी सो ळाये वर्षीं मृत्यु असें जाणावें.

## ग्रहांचा दृष्टि

पादैक दृष्टिर्दशमे तृतीये द्विपाद दृष्टिर्नवपंचमे वा ॥ त्रिपाददृष्टिश्चतुरष्टके च संपूर्णदृष्टिः समसप्तके च ॥ श नेस्त्वेकादशे पूर्णा दृष्टिर्जीवस्य कोणके ॥ बुधैर्ज्ञेया पू र्णदृष्टिर्भौमस्य चतुरष्टके ॥

टी० – जन्म लग्नापासून दशमस्थानीं आणि तृतीयस्थानीं जे ग्रह असतील त्यांची एकपाद दृष्टि जन्म लग्नावर असते, याच क्रमानें नव पंचमस्थानीं अ सतील त्यांची द्विपाद दृष्टि जाणावी. आणि चतुर्थ स्थानीं, अष्टमस्थानीं, जे ग्रह असतील, त्यांची त्रिपाद दृष्टि. सप्तमस्थानीं असतील त्यांची पूर्ण सम दृष्टि जाणावी. जन्म लग्नापासून शनैश्चर एकादश स्थानीं अथवा तृतीय स्थानीं असतां पूर्ण दृष्टि. पंचम अथवा नवम गुरु असला तर आणि चतु र्थ अष्टम स्थानीं भौम असला तर लग्नावर संपूर्ण दृष्टि असते.

## ग्रहांचें उच्चत्व नीचत्व

रविर्मेषे तुले नीचो वृषे चंद्रस्तु वृश्चिके ॥ भौमश्चन क्रे कर्के च स्त्रियां सौम्यो झषे तथा ॥ गुरुः कर्के च नक्रे च मीन कन्ये सितस्य च ॥ मंदस्तुलायां मेषे च कन्या राहुगृहस्य च ॥ राहुर्युग्मे तु चापे च तमो वक्केतुजं फलं ॥ प्रोक्तं गृहाणामुच्चत्वं नीचत्वं च क्रमाद्बुधैः ॥

टी० – रवि मेषींचा असल्यास उच्चत्व, तुळींचा असल्यास नीचत्व. चंद्र वृष भीं असल्यास उच्चत्व, वृश्चिकीं असला तर नीचत्व. भौम मकरीं असला त र उच्चत्व, कर्कींचा असला तर नीचत्व. बुध कन्याराशीस असला तर उच्चत्व,

मकरीचा नीचत्व गुरुकर्कीचाउच्चत्व, आणि मकरींचा नीचत्व शुक्रानेमी नउच्चत्व, कन्यानीचत्व शनि तुळीचा उच्चत्व, मेषींचा नीचत्व राहूचें क न्यागृह, आणि मिथुनीचाउच्चत्व, आणि धनीचा नीचत्व आणि केतूचें श नैश्वराप्रमाणे जाणावें.

## जन्मलग्नाचींफळें.

मेषेदैन्यमुपैतिगर्वितवृषोनानामतिर्मन्मथे. शूरः कर्कटके धृतीच्चवनपेकन्याच्चमायान्विता॥ सत्यंचै वतुलेत्वलौमलिनतापापान्वितंचैधनुर्मूर्खोयंमकरे घटेचतुरतामीनेत्वधीरामतिः॥

टी०-मेषलग्नीं जन्म आहले असतां दीनपणा, वृषभीं गर्वित. मिथुनी ना नाप्रकारची बुद्धि, कर्की मोठा शूर, सिंहलग्नी स्थिरबुधि, कन्या असत्यमा यावी, तूळीं सत्यवादी, वृश्चिक लग्नीं मलिनता, धनलग्नीं पापबुधि, म करी मूर्खपणा, कुंभीचतुरता, मीनी अल्पधीरता, अशी जन्मलग्नांची फ ळें जाणावीं.

## स्त्री जातक.

॥तनुस्थान॥ ॥मूर्तौकरोतिविधवांदिनकृत्कुजश्च राहुर्विनष्टतनयांरविजोदरिद्रां॥ शुक्रः शशांकत नयश्चगुरुश्चसाध्वीमायुःक्षयंचकुरुतेत्रचशर्वरी शः॥ ॥धनस्थान॥ ॥कुर्वतिभास्करशनैश्च रराहुभौमादारिद्र्यदुःखमतुलंनिपतंद्वितीये॥ वित्ते श्वरीमविधवांगुरुशुक्रसौम्यानारीप्रभूततनयां कुरुतेशशांकः॥२॥ सहजस्थान॥ ॥सूर्येंदु भौमगुरुशुक्रबुधास्तृतीयेकुर्युस्त्रियंबहुसुतांध नभागिनींच॥ सत्यंदिवाकरसुतः कुरुतेधनाढ्यां

लक्ष्मीं ददाति नियतं किल सैंहिकेयः ॥३॥ ॥ सहजस्थान ॥ स्वल्पं पयो भवति सूर्यसुते च तुर्ये दौर्भाग्यमुष्णकिरणं कुरुते शशी च ॥ राहुर्विनष्टतनयां क्षितिजोल्पबीजां सौख्यान्वितां भृगुसुरेज्यबुधाश्च कुर्युः ॥४॥ ॥ सुतस्थान ॥ ॥ नष्टात्मजां रविकुजौ खलु पंचमस्थौ चंद्रात्मजो बहुसुतां गुरुभार्गवौ च ॥ राहुर्ददाति मरणं रविजस्तु रोगं कन्याप्रसूतिनिरतां कुरुते शशांकः ॥५॥ ॥ रिपुस्थान ॥ षष्ठस्थिता शनिदिवाकरराहुभौमा जीवस्तथा बहुसुतां धनभागिनीं च ॥ चंद्रः करोति विधवामुशना दरिद्रां वेश्यां शशांकतनयः कलहप्रियां च ॥६॥ जायास्थान ॥ ॥ सौरारजीवबुधराहुरवींदुशुक्रा दद्युः प्रसह्य मरणं खलु सप्तमस्थाः ॥ वैधव्यबंधनभयं क्षयवित्तनाशं व्याधिप्रवासमरणं नियतं क्रमेण ॥७॥ ॥ मृत्युस्थान ॥ ॥ स्थानेऽष्टमे गुरुबुधौ नियतं वियोगं मृत्युं शशी भृगुसुतश्च तथैव राहुः ॥ सूर्यः करोति विधवां धनिनीं कुजश्च सूर्यात्मजो बहुसुतां पतिवल्लभां च ॥८॥ धर्मस्थान ॥ ॥ धर्मस्थिता भृगुदिवाकरभूमिपुत्रजीवाः सुधर्मनिरतां शशिजः सुभोगां ॥ राहुश्च सूर्यतनयश्च करोति वंध्यां नारीं प्रभूततनयां कुरुते शशांकः ॥९॥ ॥ कर्मस्थान ॥ ॥ राहुर्नभःस्थलगतो विधवां करोति पापे परां दिनकरश्च शनैश्चरश्च ॥ मृत्युं कुजोऽर्थरहितां कुटिलां च चंद्रः शेषा ग्रहा धनवतीं बहुवल्लभां च ॥१०॥ आयस्थान ॥ ॥ आये रविर्बहुसुतां धनिनीं शशांकः पुत्रान्वितां क्षितिसुतो रविजो धनाढ्यां ॥ आयुष्मतीं सुरगुरुर्भृगुजः सुपुत्रीं राहुः करोति सुभगां सुखिनीं बु

धश्च॥११॥व्ययस्थान॥ ॥ अंत्येधनव्ययवतींदि नकृद्दरिद्रांवंध्यांकुजःपररतांकुटिलांचराहुः॥सा ध्वींसितेन्यशशिजावहुपुत्रपौत्रयुक्ताविधुःप्रकुरु तेव्ययगोदिनांधां॥१२॥

| स्था | नाम | रवि | चंद्र | भौम | बुध | गुरु | शुक्र | शनि | राहुकेतु |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | तनु | विधवा | आयुष्यनाश | विधवा | पतिव्रता | पतिव्रता | पतिव्रता | दरिद्री | पुत्रमरतील |
| २ | धन | दरिद्रा दुःख | बहुपुत्रवान् | दरिद्र, दुःख | सौभाग्यअभिमपति | सौभाग्य आ० स० | सौभाग्यभा स० | दरिद्र, दुःख | दरिद्र दुःख |
| ३ | सहज | पुत्रवान्धनाढ्य | पुत्रवान्धनाढ्य | पुत्रवान्धनाढ्य | पुत्रवान्धनाढ्य | पुत्रवान्धनाढ्य | पुत्रवान्धनाढ्य | लक्ष्मीवान् | लक्ष्मीवान् |
| ४ | सुहृत् | दरिद्रता | दौर्भाग्य | अल्पसरवी | अतिसौख्य | अतिसौख्य | अतिसौख्य | दुःपभल | पुत्रनाश |
| ५ | सुत | पुत्राचानाश | कन्यापुत्रक | पुत्राचानाश | बहुपुत्रप्राप्ति | बहुपुत्रप्राप्ति | बहुपुत्रप्राप्ति | रोगी | मरणपावेल |
| ६ | रिपु | धनवान् | विधवा | धनवान् | कलहरूपअप्रिया | धनवान् | दरिद्रीवेश्या | धनवान् | धनवान् |
| ७ | जाया | रोगी | प्रवासी | विधवा | स्वय | भयबंधन | मृत्यु | वैधव्यमरण | वित्तनाश |
| ८ | मृत्यु | विधवा | वियोगमरणात | धनवान् | स्वजनवियोग | स्वजनवियोग | मरणातवियोग | अतिपुत्रसंतती | मरणान वियोग |
| ९ | धर्म | धनपुत्रयुक्तशील | संततीवान् | धर्मकृत्यकारक | उत्तमभोगी | धर्मवृद्धि | धर्मवृद्धि | वांझ | वांझ |
| १० | कर्म | पापकारिणी | दरिद्रीनारिणी | मृत्यु | धनवतीपरासर्मीति | धनवतीपरसमीति | धनवतीपरप्रीति | पापकर्मी | वैधव्य |
| ११ | आय | अतिदुःखप्राप्ति | लक्ष्मीवान् | पुत्रप्रसन | सुखी | आयुष्यवान् | पुत्रवान् | धनवान् | सौभाग्यवती |
| १२ | व्यय | खनिक | दिनाध | पापकारिणी | सुपुत्र | सुशील | पतिव्रता | रखर्चीक | आरिर्णाफर्मी |

## अष्टोत्तरीचामहादशा

आर्द्रापुनर्वसुः पुष्यआश्लेषातुरवेर्दशा॥मघापूर्वो त्तराचैवचंद्रस्यचदशास्तथा॥हस्तोचित्रास्वातिविशा चस्वातीभौमदशास्मृताः॥ज्येष्ठानुराधामूलेचसौम्य स्यचदशाबुधैः॥अभिजिच्छ्रवणःपूषाऊषाचैवशने र्दशा॥धनिष्ठाशततारापूर्वाभाद्रपदागुरोः॥उ

भापूषाश्विनीकाउराहोश्चैव दशास्मृता॥ कृत्तिकारो हिणीचोक्तामृगः शुक्र दशाबुधैः ॥ एषांभानांक्रमेणै वज्ञेयाः सूर्यादिकादशाः॥ क्रूरजा अरुभाप्रोक्ताशुभा स्यात् सौम्यखेटजा ॥

## संख्याक्रममहादशा

सूर्यस्यरसवर्षाणिइंदोः पंचदशैवच ॥ भौमस्यच रूववर्षाणिऋषिचंद्रबुधस्यच ॥ मंदस्यदशवर्षाणि गुरोश्चैकोनविंशतिः ॥ राहोर्द्वादशवर्षाणिशुक्र स्यैकोनविंशतिः ॥

टी० - आरद्रापासून आरंभ तों मृगापर्यंत २८ नक्षत्रें आणि रवि आदि, शुक्रापर्यंत ८ ग्रह यांचीपृथक् पृथक् कोष्टकें केलीं आहेत. त्यांजवरून महादशांची वर्षसंख्या आहे. त्यांत पापग्रहांस नक्षत्रें ४ चार आणि सौम्य ग्रहांस ३ तीन जाणावीं. दशांची संख्या भरून घेणें ती नक्षत्रांचे विभागानें घ्यावी. आणि जा विभागांत जन्म होईल त्या क्रमानें दशा भोग्याभोग्य जाणावी. आणि जन्मकाळीं जी दशा ती प्रथम जाणावी.

## अंतर्दशा आणावयाचाक्रम.

महादशास्वस्वदशाब्दनिघ्नाभक्ताः खवाहु शशिभिः समाद्याः॥ अंतर्दशास्युर्गगनेचराणांतदेक भावोहिमहादशास्यात् ॥

टी० - जा ग्रहाची अंतर्दशा पाहिजे ती जन्मदशेचे वर्षसंख्येनें ती वर्ष संख्या गुणून १०८ नीं भागून जो भाग येईल तीं वर्षें जाणावीं. आणि शेष उरेल तें १२ नीं गुणून पूर्ववत् भागून भाग येतील ते मास जाणावे. आणि शेष उरेल तें ३० नीं गुणून पूर्ववत् भागून भाग येतील ते दिवस जाणावे. आणि शेष उरेल तें ६० नीं गुणून पूर्ववत् भागून भाग येतील त्या घटिका असा

क्रम महादशांतील अंतर्दशा पाहाण्याचा जाणावा १२० चा भाग विंशो त्तरीला घ्यावा.

| सूर्याची महादशा वर्षे ६<br>आर्द्रा पुनर्वसु पुष्य आश्लेषा | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अंतर्दशाक्रम | | | | | |
| ग्रहांचीनावे | वर्षे | मास | दिव | घटी | फळें |
| रवि | ० | ४ | ० | ० | अशुभ |
| चंद्र | ० | १० | ० | ० | शुभ |
| मंगळ | ० | ५ | १० | ० | अशुभ |
| बुध | ० | ११ | १० | ० | शुभ |
| शनि | ० | ६ | २० | ० | अशुभ |
| गुरु | १ | ० | २० | ० | शुभ |
| राहु | ० | ८ | ० | ० | अशुभ |
| शुक्र | १ | २ | ० | ० | शुभ |
| संख्या | ६ | ० | ० | ० | |

| चंद्राची महादशा वर्षे १५<br>मघा पूर्वा उत्तरा | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अंतर्दशा | | | | | |
| ग्रह | व | मा | दि | घ | फळें |
| चंद्र | २ | १ | ० | ० | शुभ |
| भौम | १ | १ | १० | ० | अशुभ |
| बुध | २ | ४ | १० | ० | शुभ |
| शनि | १ | ४ | २० | ० | अशुभ |
| गुरु | २ | ७ | २० | ० | शुभ |
| राहु | १ | ८ | ० | ० | अशुभ |
| शुक्र | २ | ११ | ० | ० | शुभ |
| रवि | ० | १० | ० | ० | अशुभ |
| संख्या | १५ | ० | ० | ० | |

| भौमाची महादशा वर्षे ८<br>हस्त चित्रा स्वाती विशाखा | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अंतर्दशा | | | | | |
| ग्रह | व | मा | दि | प | फळें |
| भौम | ० | ७ | ३ | २० | अशुभ |
| बुध | १ | २ | ३ | २० | शुभ |
| शनि | ० | ८ | २६ | ४० | अशुभ |
| गुरु | १ | [illegible] | २६ | ४० | शुभ |
| राहु | ० | १० | २० | ० | अशुभ |
| शुक्र | १ | ६ | २० | ० | शुभ |
| रवि | ० | ५ | १२ | ० | अशुभ |
| चंद्र | १ | १ | १० | ० | शुभ |
| संख्या | ८ | | | | |

| बुधाची महादशा वर्षे १७<br>अनुराधा ज्येष्ठा मूळ | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अंतर्दशा | | | | | |
| ग्रह | व | मा | दि | प | फळें |
| बुध | २ | ८ | ३ | २० | शुभ |
| शनि | १ | ६ | २६ | ४० | अशुभ |
| गुरु | २ | ११ | २६ | ५० | शुभ |
| राहु | १ | १० | २० | ० | अशुभ |
| शुक्र | २ | २ | २० | ० | शुभ |
| रवि | ० | ११ | १० | ० | अशुभ |
| चंद्र | २ | ४ | १० | ० | शुभ |
| भौम | १ | २ | २ | २० | अशुभ |
| संख्या | १७ | | | | |

| शनीचीमहादशावर्षे १० | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| पूर्वाषाढा उत्तराषाढा. अभिजि. श्रवण | | | | | |
| अंतर्दशा | | | | | |
| ग्रह | व. | मा | दि | घ. | फळें |
| शनि | ० | ११ | ३ | २० | अशुभ |
| गुरु | १ | ९ | ३ | २० | शुभ |
| राहु | १ | १ | १० | ० | अशुभ |
| शुक्र | १ | ११ | १० | ० | शुभ |
| रवि | ० | ६ | २० | ० | अशुभ |
| चंद्र | १ | ४ | २० | ० | शुभ |
| भौम | ० | ८ | २६ | ४० | अशुभ |
| बुध | १ | ६ | २६ | ४० | शुभ |
| संख्या | १० | | | | |

| गुरूचीमहादशा वर्षे १९ | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| धनिष्ठा शततारका पूर्वाभाद्रपदा | | | | | |
| अंतर्दशा | | | | | |
| ग्रह | व. | मा. | दि. | घ. | फळें |
| गुरु | ३ | ४ | ३ | २० | शुभ |
| राहु | २ | १ | १० | ० | अशुभ |
| शुक्र | ३ | ८ | १० | ० | शुभ |
| रवि | १ | ० | २० | ० | अशुभ |
| चंद्र | २ | ७ | २० | ० | शुभ |
| भौम | १ | ४ | २६ | ४० | अशुभ |
| बुध | २ | ११ | २६ | ४० | शुभ |
| शनि | १ | ९ | ३ | २० | अशुभ |
| संख्या | १९ | | | | |

| राहूची महादशावर्षे १२ | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| उत्तराभाद्रपदा, रेवती, अश्विनी, भरणी. | | | | | |
| अंतर्दशा | | | | | |
| ग्रह | व. | मा. | दि | घ. | फळें |
| राहु | १ | ४ | ० | | अशुभ |
| शुक्र | २ | ४ | ० | | शुभ |
| रवि | ० | ८ | ० | | अशुभ |
| चंद्र | १ | ८ | ० | | शुभ |
| भौम | ० | १० | २० | | अशुभ |
| बुध | १ | १० | २० | | शुभ |
| शनि | १ | १ | १० | | अशुभ |
| गुरु | २ | १ | १० | | शुभ |
| संख्या | १२ | | | | |

| शुक्राचीमहादशा वर्षे २१ | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| कृत्तिका रोहिणी मृग | | | | | |
| अंतर्दशा | | | | | |
| ग्रह | व. | मा. | दि. | घ. | फळें. |
| शुक्र | ४ | १ | ० | | शुभ |
| रवि | १ | २ | ० | | अशुभ |
| चंद्र | २ | ११ | ० | | शुभ |
| भौम | १ | ६ | २० | | अशुभ |
| बुध | ३ | ३ | २० | | शुभ |
| शनि | १ | ११ | १० | | अशुभ |
| गुरु | ३ | ८ | १० | | शुभ |
| राहु | २ | ४ | ० | | अशुभ |
| संख्या | २१ | | | | |

तो त्या गृहाचा व्यय तो आया पेक्षां अल्प आला तर शुभ.

## गृहाच्या राशि.

अश्विन्यादित्रये मेषो मघादित्रितये हरिः ॥ मूला
दित्रितये धन्वी भद्वयं शेषराशिषु ॥ १९ ॥ ॥ ६ ॥

टी०— गृहाचीं नक्षत्रें अश्विनी, भरणी, कृत्तिका, यांची राशि मेष ॥ १ ॥ रो
हिणी मृग यांस वृषभ ॥ २ ॥ आर्द्रा पुनर्वसू यांस मिथुन ॥ ३ ॥ पुष्य आश्लेषा
यांस कर्क ॥ ४ ॥ मघा पूर्वा उत्तरा यांस सिंह ॥ ५ ॥ हस्त चित्रा यांस कन्या ६
स्वाती विशाखा यांस तूळ ॥ ७ ॥ अनुराधा ज्येष्ठा यांस वृश्चिक ॥ ८ ॥ मूळ पू
र्वाषाढा उत्तराषाढा यांस धन ॥ ९ ॥ श्रवण धनिष्ठा यांस मकर १० ॥ शत
तारका पूर्वाभाद्रपदा यांस कुंभ ॥ ११ ॥ उत्तरा भाद्रपदा रेवती यांस मीन
॥ १२ ॥ या प्रकारें अनुक्रमें राशि जाणाव्या.

## गृहाचें नाम आणण्याचा प्रकार.

गृहस्य पूर्वतो दिक्षु क्रमात्कक्ष्याब्धिदंतिनः ॥ सं
स्थाप्यालिंदजानंकांस्तन्मित्याषोडशगृहाः ॥ २० ॥

टी०— गृहाचे पूर्व दिशा क्रमाने अंक घालावयाचे ते असे, पूर्वेस १ दक्षि
णेस २ पश्चिमेस ४ उत्तरेस ८ असे चोहों दिशेस स्थापावे. आणि त्या
गृहाचें मुख असेल त्या दिशांकांत, शाळाची संख्या असेल त्याजवर एक
अधिक धरून मिळवावी, जे अंक येतील तें त्या गृहाचें नाम जाणावें.

गृहाचें नाव ॥ ध्रुवं धान्यं जयं नंदं खरं कांतं मनोर
मं ॥ सुमुखं दुर्मुखं क्रूरं रिपुदं धनदं क्षयं ॥ २१ ॥
आक्रंदं विपुलं ज्ञेयं विजयं चेति षोडश ॥ गृहं क्र
मादिकं ज्ञेयं नामतुल्यफलप्रदम् ॥ २२ ॥

टी०— हीं षोडश नावें आहेत यांचीं फळें नामाप्रमाणें शुभाशुभ जाणावीं.

## अंशआणण्याचाप्रकार.

व्ययेनसंयुतेक्षेत्रे गृहनामाक्षरान्विते॥ त्रिभिर्भ
क्तांशकास्तेषां द्वितीयोंशोनशोभनः॥२३॥

टी०– मागील व्यय अंक आला असेल तो क्षेत्र फळांत मिळवावा आणि गृहाची नामाक्षरें मिळवावीं आणि तिहींनीं भागावें शेष २ उरले तर वाईट अन्य शुभ होत.

## गृहाचे भाग.

नवभागंगृहंकुर्यात्पंचभागंतुदक्षिणे॥ त्रिभागंवा
मतः कुर्याच्छेषंद्वारंप्रकल्पयेत्॥२४॥ ॥ ५॥

टी०– गृहक्षेत्राचे ९भाग करावे त्यांत ५भाग दक्षिणेस. आणि ३भाग उत्तरेस मध्ये १ भाग तें द्वार याप्रकारें भाग कल्पावे

## गृहाचेंद्वार.

द्वारस्योपरियद्द्वारंद्वारस्यान्यच्चसंमुखं॥ व्ययदं
तुयदातच्चनकर्तव्यंशुभेप्सुभिः॥२५॥

टी०– द्वारावर आणि समोरासमोर हीं द्वारें व्ययदायक होत. शुभइच्छा असेल त्यांही वर्जावी

## गृहाचे स्थानाचायोजनांचाप्रकार.

स्नानागारंदिशिप्राच्यामाग्नेय्यांपचनालयं॥ या
म्यायांशयनागारंनैर्ऋत्यांशस्त्रमंदिरं॥२६॥ प्रती
च्यांभोजनागारंवायव्यांपशुमंदिरं॥ भांडकोशं
चोत्तरस्यांईशान्यांदेवमंदिरं॥२७॥ ॥

टी०– पूर्वेस स्नानाचें घर॥१॥ आग्नेयकोणास पाकमंदिर॥२॥ दक्षिणेस शयनस्थान॥३॥ नैर्ऋत्येस शस्त्रमंदिर॥४॥ पश्चिमेस भोजनस्थान॥५॥ वायव्येस पशुमंदिर॥६॥ उत्तरेस भांडार कोश॥७॥ ईशान्येस

देवांचें मंदिर ॥ ८ ॥ या प्रकारें योजना कराव्या.

## अल्पदोष.

अल्पदोषंगुणश्रेष्ठंदोषायनभवेद्गृहं ॥ आयव्य
योभयत्नेनविरुद्धंभंचवर्जयेत् ॥ २८ ॥ ॥ ६ ॥

टी०- गृहास अल्पदोष आला परंतु बहुगुणे करून श्रेष्ठ आलें तर त्यास ते दोषनाहीं आय व्यय अथवा नक्षत्र विरुध आलें तर वर्जावें.

## वास्तुचक्राचींनावें

आरंभेवृषभंचक्रंस्तंभेज्ञेयंतुकूर्मकं ॥ प्रवेशे
कलशंचक्रंवास्तुचक्रंबुधैःशुभं ॥ २९ ॥

टी०- गृहारंभास वृषभवास्तु, आणि स्तंभस्थापनेस कूर्म वास्तु, गृहप्रवेशास कलश हीं वास्तुचक्रें पाहावीं.

## गृहारंभासमास.

सौम्यफाल्गुनवैशाखभाद्रश्रावणकार्तिकाः ॥
मासाःस्युर्गृहनिर्माणेपुत्रारोग्यधनप्रदाः ॥ ३० ॥

टी०- पौषफाल्गुन वैशाख भाद्रपद श्रावण कार्तिक त्यामहिन्यांत गृहारंभ व शिलान्यास व स्तंभप्रतिष्ठेस प्रशस्त, पुत्र आणि आरोग्यता, आयुष्याची वृद्धी, धनप्राप्ति होते.

## गृहारंभासमासफळ.

शोकोधान्यंपंचतानिःपशुत्वंस्वाप्तिर्नैस्वंसंगरं
भृत्यनाशं ॥ सच्छ्रीप्राप्तिंवन्हिभीतिंचलक्ष्मींकुर्यु
श्चैत्राद्यागृहारंभकाले ॥ ३१ ॥ ॥ ७ ॥

टी०- चैत्रमास शोकप्राप्ति ॥ १ ॥ वैशाख धान्यप्राप्ति ॥ २ ॥ ज्येष्ठ मृत्यु ॥ ३ ॥ आषाढ निःपशुत्व ॥ ४ ॥ श्रावण द्रव्यप्राप्ति ॥ ५ ॥ भाद्रपद दरिद्र ॥ ६ ॥ आश्विन कलह ॥ ७ ॥ कार्तिक चाकराचानाश ॥ ८ ॥ मार्ग

शीर्ष धनप्राप्ति ॥९॥ पौष लक्ष्मी ॥१०॥ माघ अग्निभय ॥११॥ फाल्गु न लक्ष्मी ॥ १२॥ याप्रकारें गृहारंभास उक्त मास फळें जाणावीं॥

## गृहाचें मुख दिशा परत्वें करावयाचें.

कर्कनक्रहरिकुंभगतेर्के पूर्वपश्चिममुखानिगृहाणि तौलिमेषवृषवृश्चिकयाते दक्षिणोत्तरमुखानिव दंति ॥ ३२ ॥ ॥ ६॥ ॥ ५॥

टी०– कर्क, मकर, सिंह, कुंभ, या राशीस सूर्य असतां गृहाचें मुख पूर्वेस अथवा पश्चिमेस ॥ तूळ, मेष, वृषभ, वृश्चिक, या राशीचा सूर्य असतां गृहाचें मुख दक्षिणेस अथवा उत्तरेस करावें ॥ याप्रकारें रत्नमाला ग्रंथीं सांगितलें आहे.

## गृहारंभास नक्षत्रें.

श्युत्तरामृगरोहिण्यां पुष्यमैत्रकरत्रये ॥ धनिष्ठाद्वितये पौष्णे गृहारंभः प्रशस्यते ॥ ३३॥ आदित्य भौमवर्ज्यं तु सर्वे वाराः शुभावहाः ॥ चंद्रादित्यबलं लब्ध्वा लग्ने शुभनिरीक्षिते ॥ ३४ ॥ स्तंभोच्छ्रायस्तु कर्तव्य अन्यत्तु परिवर्जयेत् ॥ प्रासादे चैवमेवस्यात्कूपवापीषु चैव हि ॥३५॥ ॥ ७॥

टी०– तीन उत्तरा, मृग, रोहिणी, पुष्य अनुराधा, हस्त, चित्रा, स्वाती, धनिष्ठा, शततारका, रेवती, हीं नक्षत्रें उक्त, आणि रवि भौमवार हे वर्ज करून स्थिर लग्नी शुभग्रहांचीदृष्टिअसेल तें घ्यावें आणि स्तंभारोपण करावें अन्यकर्मास उक्त नाहीं, देवळें, कूप, वापी, तटाक, यांस लास उक्त होय

## वृषचक्र.

त्रिवेदाब्धित्रिवेदाब्धिद्वित्रिभे घर्कतः शशी ॥ कुर्या

लक्ष्मीसमुद्दासंस्थैर्यंलक्ष्मींदरिद्रतां॥धनंहानिं
क्रमान्मृत्युमारंभेवृषचक्रकम्॥२६॥ ॥५॥

टी०– सूर्यनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापावेतों त्यांचा मोजण्याचा क्रम आहे, तो प्रथम ३ नक्षत्रें लक्ष्मी दायक, द्वितीय भाग ४ न० उद्वास, तृतीय भाग ४ न० स्थीरता, चतुर्थभाग ३ न० लक्ष्मी, पंचमभाग ४ न० दरिद्रता, षष्ठ भाग ४ न० धन, सप्तम भाग २ न० हानि, अष्टमभाग ३ नक्षत्रें त्यांचें फळ मृत्यु, या प्रकारें पाहाण्याचा क्रम, त्यांतून शुभफळ ज्या दिवस नक्षत्रास येईल त्या दिवसीं आरंभास उक्त होय.

## शिलान्यास.

दक्षिणपूर्वेकोणेकृत्वापूजांशिलांन्यसेत्प्रथमां॥शेषाः
प्रदक्षिणेनस्तंभाश्चैवंप्रतिष्ठाप्याः॥२७॥

टी०– आग्नेय कोणीं प्रथम शिळा पूजा करून पुरावी, शेष शिळा प्रदक्षिण पुराव्या स्तंभही शिळाप्रमाणेंच स्थापावे.

नक्षत्रेंशिलान्यासास॥शिलान्यासःप्रकर्तव्यो
गृहाणांश्रवणेमृगे॥पौष्णेहस्तेचरोहिण्यांपुष्या
श्विन्युत्तरात्रये॥२७॥ ॥५॥ ॥

टी०– शिलान्यासास श्रवण, मृग, रेवती, हस्त, रोहिणी, पुष्य, अश्विनी, ३ उत्तरा, हीं उक्त होत.

शेषाचेंमुख॥ ॥कन्यासिंहेतुलायांभुजगपतिमु
खंशंभुकोणेग्निखातंवायव्येस्यात्तदास्यंत्वलिध
नमकरेईशखातंवदंति॥कुंभेमीनेचमेषेनिर्ऋतिदि
शिमुखंखातवायव्यकोणेचाग्नेकोणेमुखंवेवृषमि
थुनगतेकर्कटेरक्षखातं॥२८॥

टी०– कन्या, सिंह, तूळ, ह्या लग्नीं शेषाचें मुख ईशान्य कोणी तर आग्नेय

कोणीं स्नान करावें. वृश्चिक, धन, मकर, त्या लग्नी शेषाचे मुख वायव्येस अ सलें तर ईशान्येस स्नान करावें कुंभ, मीन, मेष त्या० ल० निर्ऋत्येस मुख अ सलें तर वायव्य कोणी स्नान करावें. वृषभ, मिथुन, कर्क, त्या ल० आग्न येस असलें तर निर्ऋत्येस स्नान करावें

दुष्टयोग॥ ॥वज्रव्याघातशूलाश्चव्यतीपातश्च गंडकः॥विष्कंभपरिघौवर्ज्यौवारौमंगलभास्करौ॥३९

टी०-वज्र, व्याघात, शूल, व्यतिपात, गंड विष्कंभ, परिघ, आणि भौम, रवि वार असे वर्जावे

कूर्मचक्र॥ ॥तिथिस्तुपंचगुणिताकृत्तिकादृक्ष संयुता॥तथाद्वादशभिश्चाचनवभागेनभाजिता॥४० फळ॥ ॥जलेवेदमुनिश्चंद्रस्थलेपंचद्वयंवसुः॥त्रि षड्नवचाकाशेत्रिविधंकूर्मलक्षणं॥४१॥जलेला भस्तथाप्रोक्तः स्थलेहानिस्तथैवच॥आकाशेम रणंप्रोक्तमिदंकूर्मस्यचक्रकम्॥४२॥ ॥

टी०-आरंभाची तिथि पांचानीं गुणावी आणि कृत्तिकापासून दिवसनक्षत्रें येती ल तीं आंत मिळवावीं आणि १२अक त्यांत मिळवावे नंतर नवानी भागावे शेष ४,७,१,राहिलेअसता कूर्मजलस्थानी आहे-याचे फळ लाभ. आणि ५,२,८,शेषउ रलेतरकूर्म स्थलांचेठायी आहेयाचे फळ हानि आणि ३,६,९,शेषउरलेतर कूर्म आकाशाचे ठायीआहे त्याचें फळमरण असे त्रिविध कूर्म लक्षण जाणावे

घडितकाष्ठकामउभेंकरण्यासमुहूर्त-

॥स्तंभचक्र॥ ॥सूर्याधिष्ठितभद्वयंप्रथमतोमध्ये तथाविंशति स्तंभाग्रेरससंख्ययामुनिवरैरुक्तंमु हूर्तंशुभं॥ ॥फळ॥ ॥स्तंभाग्रे मरणंभवेत्गृ हपतेर्मूलेधनार्थक्षयोमध्येचैवतुसर्वसौख्य

मत्रुखंप्राप्नोतिकर्तासदा ॥ ४४ ॥

टी०— सूर्य नक्षत्रा पासून दिवस नक्षत्र पर्यंत घ्यावयाचा क्रम. त्यांत प्रथम ८ न नक्षत्रें स्तंभ मूळ, याचें फळ धनक्षय. आणि द्वितीय २० नक्षत्रें स्तंभमध्य, श्री, लक्ष्मी, कीर्ति, आणि तृतीय ८ नक्षत्रें स्तंभाग्र, मरण असें आहे, त्यास ज्या विभागाचें शुभफळ त्या नक्षत्रीं स्तंभरोपण करावें.

॥ आउग्यास मुहूर्त ॥ ॥ मूलेमोभे त्रिऋक्षंगृहपतिमरणंपंचगर्भेसुखंस्यात्मध्येदेयाष्टऋक्षंधनसुतसुखदंपुच्छदेशेष्टहानिः ॥ ४५ ॥ पश्चाद्देयेत्रिऋक्षंगृहपतिसुखदंभाग्यपुत्रार्थदेयं सूर्यर्क्षाच्चंद्रऋक्षंप्रतिदिनगणयेन्नोभचक्रंविलोक्य ॥ ४६ ॥

टी०— सूर्य नक्षत्रा पासून दिवस नक्षत्रा पावेतों घेण्याचा क्रम आहे; प्रथम ३ नक्षत्रें मूळ त्याचेस मृत्यु, द्वितीय ५ न० गर्भी सुख. तृतीय ८ न० मध्य धनसुत सुख, चतुर्थ ८ न० पुछभाग मित्र हानि, पंचम ३ न० अग्र, सुखभाग्य, पुत्रलाभ, असीं शुभफळें आहेत.

॥ द्वारचक्र ॥ ॥ अर्काच्चत्वारिऋक्षाणिऊर्ध्वेचैव प्रदापयेत् ॥ द्वौद्वौकोणेषुदद्याद्वेशाखायांचचतुश्चतुः ॥ ४७ ॥ अधश्चत्वारिदेयानिमध्येत्रीणिप्रदापयेत् ॥ ऊर्ध्वेतुलभतेराज्यमुद्वासंकोणकेषुच ॥ ४८ ॥ शाखायांलभतेलक्ष्मीर्मध्येराज्यप्रदंतथा ॥ अधस्थेमरणंप्रोक्तंद्वारचक्रंप्रकीर्तितं ॥ ४९ ॥

टी०— सूर्य नक्षत्रा पासून दिवस नक्षत्रा पर्यंत घेण्याचा क्रम; त्यांत प्रथम ४ नक्षत्रें ऊर्ध्व, त्याचें फळ राज्यप्राप्ति. द्वार कोण च्यार त्याचे दर कोणास २ नक्षत्रें त्याचें फळ उद्वास. बाजू दोन दर बाजूस न० ४ च्यार, फळ लक्ष्मी. उंबरवठास नक्षत्रें ४ फळ राज्य. मध्यें न० ३ फ० मरण.

## शांतीसअग्निचक्र.

सैकातिथिर्वारयुत्ताकृता स्ताशेषेगुणे भ्रेभुविवन्हि
वासः ॥ सौख्यायहोमेशशियुग्मशेषेप्राणार्थनाशौ दिविभूतलेच ॥ ५० ॥

टी०—जातिथीस शांति करणें तीतिथि,त्यांत १ मिळवावा. आणि सातजो
वार असेल ते अंकत्यान मिळवावे. त्यास ४ नीं भागावें शेषउरेल त्यानें
फळ, ३ अथवा शून्य० आलें असता अग्नि मृत्युलोकीं आहे,त्यानें फळ
सौख्य प्राप्ति,शांतीसउक्त होय शेष १ उरला असतां प्राण नाश. २शेषउ
रले असतां अर्थनाश. या दोहों अंकांची फळ श्रुनी ही शांतीसउक्त नाहीं.

॥गृहमुखांतआहुतीपातपाहाणें॥ ॥तरणिविद्गुभास्करिचंद्रमःकुजसुरेज्यविधुंतुदकेतवः॥रविभतोदिनभंगणयेत्क्रमात्प्रतिखगंत्रितयंत्रितयंन्यसेत् ॥ ५१ ॥

टी०—सूर्यनक्षत्रा पासून दिवस नक्षत्र पावेतों मोजण्याचा क्रम, त्याचें
फळ प्रथम ३नक्षत्रे सूर्य अशुभ, द्वितीय भाग ३नक्षत्रे बुध,फळशुभ,
तृतीय भाग ३न० शुक्र,फ० शुभ, चतुर्थ भा० ३न० शनि,फ० अशुभ, पं०भा०
३न० चंद्र,फ० शुभ, षष्ठभा० ३न० मंगळ,फ० अशुभ, सप्त०भा०३न०
गुरु,फ० शुभ, अ०भा० ३न० राहू फ० अशुभ, नवम भा० ३ नक्षत्रे के
तु त्याचे फळ अशुभ.

## ग्रहप्रवेशाचाक्रम.

अथप्रवेशोनवमंदिरस्ययात्रानिवृत्तावथभूपतीनां॥सौम्यायनेपूर्वदिनेविधेयंचास्त्वर्चनंभूतबलिश्चसम्यक्॥ ५२ ॥

टी०—नवे गृहांत प्रवेशकरणे यात्रेहून घरीयेणें, राजदर्शनास जाणे,

यांचे पूर्व दिवशीं वास्तु पूजा करून भूत बळी द्यावा आणि उदगयनही अ-
सावें.

चित्रानुराधामृगपौष्णपुष्यस्वातीश्रविष्ठाश्रवणं
चमूलं ॥ वारेषुसूर्यक्षितिजेषुरिक्तातिथौप्रशस्तो
भवनप्रवेशः ॥ ५३ ॥

टी०— चित्रा, अनुराधा, मृग, रेवती, पुष्य, स्वाती, धनिष्ठा, श्रवण, मूळ, हीं
नक्षत्रें उक्त. आणि रवि, भौम, हे वार. आणि रिक्ता तिथि वर्ज करून गृह
प्रवेश करावा.

कलशचक्र ॥ ॥ प्रवेशेकलशेर्कक्षात्पंचनागाष्टष
ट्क्रमात् ॥ अशुभंचशुभंज्ञेयमशुभंचशुभंतथा ॥

टी०— सूर्यनक्षत्रा पासून दिवस नक्षत्रा पावेतों मोजण्याचा क्रम. प्रथम
५ नक्षत्रें अशुभ, आणि ८ न० शुभ, पुढें ८ न० अशुभ, ६ न० शुभ, या प्र-
कारें कलशचक्र होय.

वामार्कलक्षण ॥ ॥ रंध्रात्सुताद्दनादायात्पंचस्वर्केस्थि
तेक्रमात् ॥ पूर्वाशादिमुखंगेहंविशेद्वामोभवेद्रतः ॥

टी०— घरांत प्रवेश करण्याचे समयीं सूर्य वामार्क असावा. तो पहावयाचा
क्रम. प्रवेश लग्नीं अष्टमस्थाना पासून पंचमस्थानीं सूर्य आणि घराचें मुख पू
र्वेस. तसाच घराचें मुख दक्षिणेस असलें त्यास ५ स्थाना पा० पंचम स्था-
ना पर्यंत ॥ २ ॥ आणि घराचें मुख पश्चिमेस असल्यास २ स्थाना पा० ५ स्था
ना पर्यंत ॥ ३ ॥ अथवा घराचें मुख उत्तरेस अ० सूर्य ११ स्थाना पा० ५ स्थाना
पर्यंत आला तर प्रवेशास वामार्क होतो. तो उक्त जाणावा.

गृहशुभाशुभलग्नीं पाहाणें ॥ त्रिकोणकेंद्रगैः शु
भैस्त्रिषष्ठलाभसंस्थितैः ॥ अस्तद्दष्टैस्थिरोदये गृ
हंविशेद्दलेविधौ ॥ ५६ ॥

टी०– गृहप्रवेशास त्रिकोण व केंद्रस्थानीं शुभग्रह, असें स्थिर लग्न पाहून. आणि तिसरे साहावे आणि लाभस्थानी पापग्रह आले तर शुभजाणावे

गृहारंभाचीलग्नशुद्धि

त्रिषडायगतैःपापैरष्टांत्येतरगैःशुभैः॥चंद्रेलग्ना रिरंध्रांत्यवर्जितेस्याच्छुभंगृहम्॥५७॥

टी०–३,६,११,स्थानीं पापग्रह शुभ आणि ८,१२,स्थानाहून इतरस्थानीशु भग्रह असता शुभजाणावे, परंतु चंद्र लग्नीं, षष्ठ, द्वादश, अष्टम, स्थानी नसावा

अशुभयोगान्वेंलग्न॥ ॥धनकेंद्रत्रिकोणस्थःक्षीण चंद्रोनशोभनः॥शत्रोर्नवांशगःखेटःखास्तसंस्थोपि नोशुभः॥ ॥५॥ ॥५॥ ॥

टी०– लग्नाचे ठायी २,१,४,७,१०,५,९,यास्थानी कृष्णपक्षीचाचंद्र अ-शुभ आणि शत्रूच्या नवांशी कोणीही ग्रह १०,७, स्थानी नसावेत

आयुष्यप्रमाण॥ ॥लग्नेजीवःखखेशुक्रोबुधःकर्म ण्यरोरविः॥रविजःसहजेनूनंशतायुःस्यात्तदागृहं॥५९

टी०–लग्नींबृहस्पति,खहस्थानीं शुक्र १०,बुध ६, रवि ३, शनिसहज,असें शुभलग्नी घरास आरंभ केल्याअसतां १०० वर्षे आयुष्य जाणावे

आयुष्यप्र०॥ ॥भृगुर्लग्नेबुधोव्योम्निलाभेर्कःकेंद्र गोगुरुः यस्यारंभेचतस्यायुर्वत्सराणांशतद्वयम्॥६०

टी०–शुक्र,आणि बुध, दशमस्थानी, आणि ११ स्था० रवि, केंद्रस्थानीं गुरु, अ से घराच्या आरंभाचे लग्नीं ग्रह आलेतर आयुष्य २०० वर्षे जाणावे

गृहायु०॥जीवोबुधोभृगुर्व्योम्निलाभगौभानुभूमिजौ॥ आरंभेयस्यतस्यायुःसमाशीतिःसहश्रिया॥६१॥

टी०–बृहस्पतिअथवाबुध शुक्र १० स्थानी-रवि,भौम ११स्थानीं गृहारंभास

असले तर ८० वर्षे आयुष्य प्रमाण, लक्ष्मी सहित नांदेल.

स्वोच्चवर्तिनि भृगौ विलग्नगे देवमंत्रिणि रसातलेऽथवा॥
स्वोच्चगे रविसुते थवायगे स्यात्स्थितिश्चिरसहश्रिया॥

टी०- शुक्र लग्नीं, बृहस्पति ४ स्थानीं. शनि ११ स्थानीं, असे स्वगृहींच्या लग्नावर घरास आरंभ केला ह० चिरकाल लक्ष्मीयुक्त असेल.

स्वर्क्षगे हिमगौ लाभे स्फुरेज्ये केंद्रसंस्थिते॥ धनधान्यसुतारोग्ययुक्तं धाम चिरं भवेत्॥ ६२॥

टी०- कर्कीचा चंद्र एकादश स्थानीं. आणि गुरु केंद्रस्थानीं, असा योग लग्नीं असला तर तें गृह धनधान्य युक्त आणि सुत आरोग्य चिरकाल असेल.

## अन्यमतें पृथ्वी शोधण्याचा प्रकार.

कुंडार्थं पृथ्वीपरिशोधहेतवे प्रष्टुर्मुखाद्यः प्रथमं स्फुटो भवेत्॥ वर्गादिवर्णः किल तद्दिशि स्मृतं शल्यं मुनींद्रैर्हयपैस्तु मध्यतः॥ ६३॥ स्मृत्वेष्टदेवतां प्रष्टुर्वचनस्याद्यमक्षरं॥ गृहीत्वा तु ततः शल्याशल्यसम्यग्विचार्यते॥ ६४

टी०- कुंडार्थ अथवा नूतन गृह करण्यास प्रथम जागा शोधण्याचा प्रकार. पृछकानीं इष्टदेवताचें स्मरण करून विप्रास प्रश्न करावा त्याच्या मुखांतुन आदिअक्षर जा वर्गांतील येईल त्याचें उत्तर द्विजानी अकचटतपयश वर्ग, पूर्वादि अष्टदिशांस आणि मध्यभागीं हपय वर्गाचे आदि अक्षर येईल त्या जाग्यांत अमुकशल्य आहे, त्याचा प्रकार खालीं लिहिला त्याजवरून फळश्रुती त्या त्या जाग्यास पाहावी.

## प्रश्नाक्षरफळें.

पूर्व॥ पृच्छायां यदि अः प्राच्यां नरशल्यं तदा भवेत्॥ सार्धहस्तप्रमाणेन तच्च मानुष्यमृत्युकृत्॥ ६५॥ आग्नेय॥ आग्नेय्यां दिशि कः प्रश्ने खरशल्यं करद्वये॥ राजदंडो भवेत्तत्र भयं नैव निवर्तते॥ ६६॥ दक्षिण॥ याम्यायां दि

शिवः प्रश्नेतदास्यात्कटिसंस्थितं॥ नरशल्यं गृहेतस्य मरणंचिररोगतः॥६७॥ नैर्ऋत्य॥ नैर्ऋत्यांयदिटःप्रश्ने सार्धहस्तादधस्थले॥ शुनोस्थिजायतेतत्रबालानांजा यतेमृतिः॥६८॥ पश्चिम॥ तःप्रश्नेपश्चिमायांतुशिशोः शल्यंप्रजायते॥ सार्धहस्तेगृहस्वामीनतिष्ठतिसदागृ हे॥६९॥ वायव्य॥ वायव्यांदिशिपःप्रश्नेतुअंगाराश्च तुष्करे॥ कुर्वंतिमित्रनाशंचदुःस्वप्नदर्शनंसदा॥७०॥ उत्तर॥ उदीच्यांदिशियःप्रश्नेविप्रशल्यंकरादधः॥ त च्छीघ्रंनिर्धनत्वाय कुबेरसदृशस्यहि॥७१॥ ईशान्य॥ ईशान्यांयदिशःप्रश्नेगोशल्यंसार्द्धहस्ततः॥ तद्गोधन स्यनाशायजायतेगृहमेधिनः॥७२॥ मध्यभागीं॥ हषयामध्यकोष्टेचवक्षोमात्रंभवेदधः॥ नृकपालम थोभस्मलोहंतत्कुलनाशकृत्॥७३॥ ॥७॥

टी०- पृछकानें मुखांतोन आदि अक्षर अ वर्गाचें आलें तर पूर्वेचे कोष्टकां त दीड हात ओल खणलें असतां नराची हाडें सांपडतील तीं न काढल्यास मृ त्यु कारक होत ॥१॥ क अक्षर आल्यास आग्नेय कोणी २ हात ओंडावर,त्य राच्या अस्थि सांपडतील, त्यान काढल्यास राजदंडापासून भय निवृत्ति होणा र नाहीं ॥२॥ च अक्षर आल्यास दक्षिणेस कंबरे बराबर ओंड खणावें, न राच्या अस्थि सापडतील त्या न काढल्यास मरण प्राय चिरकाळ रोगी॥३॥ ट आला तर १॥ हस्तावर कुत्र्याच्या अस्थि सांप० त्या न काढ० मुलें वांचणा र नाहींत॥४॥ त आल्यास मुलाचीं हाडे.तीं न काढ० घरांत वास्तव्य हो णार नाहीं ॥५॥ प वर्ग वायव्य कोणास ४ हातांवर तूस व कोळसे साप० तेन काढ० मित्रनाश दुःस्वप्न होईल॥६॥ य वर्ग उत्तर कोनास १ हात खोल ब्राह्मणाच्या अस्थि सां० त्या न का० कुबेर सदृश धनवान् असला तरी दरि-

द्री होईल ॥ ७ ॥ श्र ईशान्य कोणीं ॥ १ ॥ हातावर गाईच्या अस्थिसा०थोंनका ढ० गोधनाचा नाश ॥ ८ ॥ ह्र पथ्य मध्यभागीं छातीभर ओंडीवर नराचें कपाळ आणि भस्म व लोह सांपडेल तें न काढलें नर कुळाचा नाश होईल ॥ ९ ॥ या प्रकारें ज्या वर्गांतील नांव येईल त्या दिशेस पाहावें आणि वर्णाचें आदि अक्षर पृछकांचे मुखांतोन या वर्णा शिवाय आल्यास त्याचें फळ कांहीं घेऊंनये.

---

## यात्राप्रकरण.

### शुक्र

सन्मुख ॥ एकग्रामेपुरेवापिदुर्भिक्षेराष्ट्रविप्लवे ॥ वि
वाहेतीर्थयात्रायांप्रतिशुक्रोनविद्यते ॥ १ ॥

टी०- गांवचे गांवांत. अथवा शहराचे शहरांत. दुर्भिक्षकाळीं व राजाचें धर णें येतें त्यास. विवाह समयीं. तीर्थ यात्रेस सन्मुख शुक्र असला तर दोषनाहीं.

पोष्णादाचग्निपादांतंयावत्तिष्ठतिचंद्रमाः ॥ तावच्छु
क्रोभवेदंधःसन्मुखंगमनंशुभं ॥ २ ॥

टी०- रेवती, अश्विनी, भरणी, कृत्तिका या नक्षत्रांचे प्रथम चरणीं चंद्र असला म्हणजे शुक्र अंध असतो, तो सन्मुख घेतला तरीं गमनास दोष नाहीं.

शुभाशुभ फळ॥ ॥ दक्षिणेदुःखदःशुक्रःसन्मुखोहं
तिमंगलं ॥ वामेपृष्ठेशुभो नित्यंरो धयेदस्तगःशुभः ॥ ३

टी०- बाहेर जातांना शुक्र दक्षिणेस दुःखदायक, सन्मुख कार्य हानि. आणि डावीकडे व पृष्ठभागीं घेऊन गमन करावें शुभ होय. पूर्वेस अस्त असला तर पश्चिमेस शुभ. आणि पश्चिमेस अस्त असल्यास पूर्व दिशेस शुभ जाणावा.

### घातचंद्र

प्रयाणकाले युद्धेचकृषौवाणिज्यसंग्रहे ॥ वादेचैवगृ

द्दारंभे घातचंद्रं विवर्जयेत् ॥ ४॥

टी०– यात्रेसजातां, वस्तुक्षास, कृषिकरण्यास, व्यापारास, धान्यादिसंग्रहास, वादासमयीं, घराचे आरंभास, घातचंद्र वर्जावा.

## घातप्रकरण

घाततिथिंघातवारंघातनक्षत्रमेवच ॥ यात्रायांवर्जयेत्प्राज्ञैरन्यकर्मसुशोभनं ॥ ५॥

टी०–गमनकाळीं घात वार नक्षत्रें तिथि अशीं वर्जावीं अन्यकर्मास शुभ

मेषेरविर्मघाप्रोक्तापष्ठीप्रथमचंद्रमाः ॥ वृषभेपंचमोहस्तश्चतुर्थीशनिरेवच ॥ ६॥ मिथुनेनवमःस्वातीअष्टमीचंद्रवासरः ॥ कर्केहिरनुराधाचबुधःषष्ठीप्रकीर्तिता ॥ ७॥ सिंहेषष्ठश्चंद्रमाश्चदशमीशनिमूलके ॥ कन्यायांदशमश्चंद्रःश्रवणःशनिरष्टमी ॥ ८॥ तूलेगुरुर्द्वादशीस्याच्छतंतृतीयचंद्रमाः ॥ वृश्चिकेरेवतीसप्तदशमीभार्गवस्तथा ॥ ९॥ धनेचतुर्थोभरणीद्वितीयाभार्गवस्तथा ॥ मकरेष्टमोरोहिणी द्वादशी भौमवासरः ॥ १०॥ कुंभेएकादशश्चार्द्राचतुर्थीगुरुवासरः ॥ मीनेचद्वादशःसार्पद्वितीयाभार्गवस्तथा ॥ ११॥

| राशि | मेष | वृषभ | मिथुन | कर्क | सिंह | कन्या | तूळ | वृश्चिक | धन | मकर | कुंभ | मीन |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| चंद्र, | १ | ५ | ९ | २ | ६ | १० | ३ | ७ | ४ | ८ | ११ | १२ |
| वार | रवि | शनि | सोम | बुध | शनि | शनि | गुरु | शुक्र | शुक्र | भौम | गुरु | शुक्र |
| नक्षत्र | मघा | हस्त | स्वाती | अनु० | मूळ | श्रवण | शत० | रेव० | भर० | रोहि० | आर० | आश्ले० |
| तिथि | ६ | ४ | ८ | ६ | १० | ८ | १२ | १० | २ | १२ | ४ | २ |

याप्रकारें मेषादिद्वादशराशिपरत्वे घातचतुष्टय स्वराशीस वर्जून प्रयाण करावें

## काळचंद्र

राशिपरत्वें ॥ ॥मेषेवेदावृषेऽष्टौचमिथुनेचतृतीयकः॥ दश
कर्केरविः सिंहेकन्या अंकः प्रकीर्तितः॥१३॥षट्तुलेवृश्चि
केखेंदु धनेरुद्राः प्रकीर्तिताः॥मकरेऋषयः प्रोक्ताः कुं
भेबाणाउदाहृताः॥मीनेऽब्धिः काळचंद्राः शौनकोऽब्रवी
दमब्रवीत्॥१४॥ ॥६॥ ॥७॥

टी०- मेषराशीस ४ चंद्र, वृषभराशीस ८ चंद्र, मिथुनराशीस ३ चंद्र, कर्कास १० चंद्र, सिंहास १२ चंद्र, कन्येस ९ चंद्र, तूळास ६ चंद्र, वृश्चिकास १० चंद्र, धनास ११ चंद्र, मकरास ७ चंद्र, कुंभास ५ चंद्र, मीनास ४ चंद्र, याप्रकारें राशि परत्वें काळचंद्र शौनकमतें आहे तो सर्व कर्मीस वर्ज्य करावा.

तिथिपरत्वें लग्नेंवर्जावयाचीं॥नंदायामलिहर्योस्तुतुला
मकरयोस्तथा॥भद्रायांमीनधनुषोःकालस्तिष्ठतिसर्व
दा॥१५॥जयायांस्त्रीमिथुनयोरिक्तायांमेषकर्कयोः॥
पूर्णायांकुंभवृषयोर्मनुष्यमरणंध्रुवं॥१६॥

टी०- नंदा तिथीस वृश्चिक, सिंह, तूळ, मकर, आणि भद्रा तिथीचीं मीन, धन लग्नें. आणि जया तिथीस कन्या, मिथुन लग्नें, आणि रिक्ता तिथीस मेष कर्क लग्नें, पूर्णा तिथीस कुंभ, वृषभ, ह्या तिथींस हीं लग्नें वर्ज करावीं. तेथें काळ उभा असतो.

## प्रयाणास नक्षत्रें उक्त.

हस्तेंदुमैत्रश्रवणाश्वितिष्यपौष्णाश्रविष्ठान्त्पुनर्वसू
श्च॥प्रोक्तानिधिष्ण्यानिनवप्रयाणेत्यक्त्वात्रिपंचादि
मसप्ततारा॥१७॥ ॥८॥

टी०- हस्त, मृगशीर्ष, अनुराधा, श्रवण, अश्विनी, पुष्य, रेवती, धनिष्ठा, पुनर्वसु, हीं नवनक्षत्रें प्रयाणास उक्त परंतु ३, ५, १, ७, ह्या तारा गमनास वर्जाव्या.

मध्यमन०॥ रोहिणी उत्तरा चित्रा मूळमार्द्रा तथैव च॥
षाढोत्तराभाद्रविश्वे प्रयाणे मध्यमाः स्मृताः॥१८॥

टी०-रोहिणी, उत्तरा, चित्रा, मूळ, आर्द्रा, पूर्वाषाढा, उत्तराभाद्रपदा, उत्तराषाढा, ही नक्षत्रें प्रस्थानास मध्यम होत.

वर्ज्यनक्षत्रें॥ त्रीणिपूर्वामघाज्येष्ठाभरणीजन्मकृत्तिका॥ सार्पःस्वातीविशाखाचनिसंगमनवर्जयेत्॥१९
कृत्तिकाएकविंशत्याभरण्यासप्तनाडिका॥ एकादश मघायाश्चत्रिपूर्वाणांचषोडश॥२॥ विशाखासार्पचित्रास्वातीरौद्रेचतुर्दश॥ आद्यास्तु घटिकास्त्याज्याः शेषांशेगमनंशुभं॥२१॥

टी०-हीनक्षत्रे प्रयाणास वर्ज करावीं. परंतु संकटसमयास तिन्ही पूर्वांचा १६ घटिका मघा ११ घटि०, ज्येष्ठा संपूर्ण भरणी ७ घ० कृत्तिका २१ घ० जन्मनक्षत्र सपूर्ण आश्लेषा विशाखा-चित्रा स्वाती आर्द्रा ह्या ५ नक्षत्रांच्या आदि १४ घ० प्रमाणे सर्वांनी वर्ज करून प्रयाण करावें.

प्रयाणासशुभाशुभवार.

अर्केक्लेशमनर्थकंचगमनेसोमेचबंधुप्रियंचांगारेनलतस्करज्वरभयंप्राप्नोतिचार्थंबुधे॥ क्षेमारोग्यसुखंकरोतिचगुरौलाभश्चशुक्रेशुभोमंदेबंधनहानिरोगमरणान्युक्तानिगर्गादिभिः॥

टी०-रविवारी गमन केलें असतां मार्गी महाक्लेश व अनर्थ प्राप्त होतात, सोमवारी बंधु आणि प्रियदर्शन, मंगळवारीं अग्नि आणि चोर व ज्वरभय प्राप्ति, बुधवारीं द्रव्य लक्ष्मी प्राप्ति, गुरुवारीं क्षेम आरोग्य सुखप्राप्ति, शुक्रवारी लाभ शुभ फळ प्राप्ति, शनिवारीं बंधन हानि रोग मरण असें प्राप्त होतें

## होराकथन व शकुन.

वारात्षष्ठस्य षष्ठस्य होरा सार्द्ध द्विनाडिका ॥ अर्क
शुक्रो बुध श्चंद्रो मंदो जीव धरासुतौ ॥ १ ॥ गुरुर्वि
वाहे गमनेच शुक्रो बोधे सौम्यः सर्वकार्येषु चंद्रः ॥
कुजेच युद्धं रवौ राजसेवा मंदेच वित्तं इति होरयोगाः
॥ २ ॥ यस्य ग्रहस्य वारे पि कर्म किंचित्प्रकीर्तितं ॥
तस्य ग्रहस्य होरायां सर्व कर्म विधीयते ॥ ३ ॥

टी०-ज्या वाराचा त्या वारीं प्रथम २॥ घटिका होरा त्यापासून साहाव्ये वाराचा दुसरा होरा, या क्रमानें दिवसाचे बारा होरे जाणावे ॥२॥ रविवाराचा राजसेवेस उक्त, द्वितीय २॥ शुक्राचा गमनास, तृतीय बुधाचा ज्ञान प्राप्तीस. चतुर्थ २॥ चंद्राचा तो सर्व कार्यास, पांचवा शनीचा द्रव्य संग्रहास, साहावा गुरूचा विवाहास, सातवा मंगळाचा युद्धांत जाण्यास उक्त. असा या प्रमाणे क्रम, आणि ज्या ज्या ग्रहाचा जो वार त्याचीं कृत्यें पूर्वीं कथियेलीं तीं त्या त्या वाराचे होऱ्यावर करावीं.

सूर्याचा होरा ॥ सूर्यस्य होरे रजकी सुवस्त्रं कुमारिका विप्र
चतुष्टयं च ॥ काकत्रयं द्वौ नकुलौ तथैव चाषस्तथैको वृष
भस्तु गौश्च ॥

टी०-रवीचे होऱ्यावर गमन केलें तर पुढें शकुन होतील ते सांगतों; परीट, वस्त्रें, कुमारिका, चार ब्राह्मण, तीन कावळे, दोन मुंगुस, दोन चाष, ऐक बैल, आणि गाय यांतून कांहीं तरीं शकुन भेटतील.

चंद्राचा होरा ॥ चंद्रस्य होरे द्विजयुग्म काक भेरी मृदंगा
नकुलः खरोष्ट्रौ ॥ हयश्च गोमेषशुन्यस्तथैव पुष्पाणि
नारीद्वय मेव मार्गे ॥

टी०- चंद्राचे होऱ्यावर गमन केलें तर मार्गाचें ठायीं दोन ब्राह्मण आणि काक व नगारे व मृदंग आणि मुंगुस व गाढव उंट व घोडा, गाय व मेंढा, कुत्रें आणि

पुष्पें व दोन स्त्रिया यांतून कांहीं भेटावीं ॥

मंगळाचाहोरा॥ मार्जारयुद्धंकलहः कुद्धं वेरजस्वला स्त्रीभुवनस्यदाहः॥ नपुंसकःश्वत्रितयंद्विजश्चनग्नो विमुक्तोधरणीसुतस्य ॥३॥

टी०- मंगळाचे होऱ्यावर गेलें असतां मांजराचें युद्ध अथवा स्त्री पुरुषांचा कलह अथवा रजस्वला स्त्री अथवा घर जळणे किंवा नपुंसक व कुत्रीं तीन किंवा नग्न ब्राह्मण भेटेल

बुधाचाहोरा॥ बुधस्यहोरेशकुनश्चसर्वःस्त्रीपुत्रयुक्ता कलशस्तुपूर्णः ॥स्कन्धातकश्चापगजौकुमारःपुष्पाणि नारीयस्तुदर्पणश्च ॥४॥

टी०- बुधाचे होऱ्यावर सर्व शकुन, स्त्री पुत्रयुक्त, कलश पाण्यानें भरलेला, चातक पक्षी व चाष पक्षी, गज किंवा मुलगा, पुष्पे व स्त्री अथवा आरसा यांतून कांहीं एक भेटेल.

गुरूचाहोरा॥ गुरोर्द्विजातिर्गणिकाचधेनुस्त्रीबाल युक्तासजलोघटस्तु॥ ऊर्णाचकाको नकुलोबकश्चहं सस्यराजाबहुवस्तुवेश्याः॥५॥

टी०-गुरूचे होऱ्यावर ब्राह्मण व कलवातीण अथवा गाय किंवा स्त्री मुलासहित व भरलेली घागर, शाल, काक, मुंगुस, बगळा, हंसाचा राजा किंवा बहुत वाणी यांतून काही भेटेल

शुक्राचाहोरा॥ शुक्रस्यहोरेगणिकाद्विजेंद्रः काकत्रि कंचाथनपुंसकोवा॥ मद्यंहिमांसंगणिकाचधेनुर्धान्यं चशूद्रत्रितयंचवैश्यः ॥६॥

टी०-शुक्राच्याहोऱ्यावर प्रथम ब्राह्मण, कलवांतीण, तीन काक, नपुंसक, मद्य, मांस, गणक जोशी गाय, धान्य, वाणी, तीन शूद्र, यांतून कोणी भेटेल.

शनीचाहोरा॥पतंगसुनोर्यवनश्चनग्नोरजस्वलास्त्री मृतकंतथैव॥पिशाचगृध्रोविधवाचवन्हिर्नपुंसकश्चाथयुवाप्रचंडः॥७॥

टी०- शनीच्या होऱ्यावर नग्न मुसलमान, रजस्वला स्त्री, प्रेत, पिशाच, गृध्र पक्षी, विधवा स्त्री, अग्नि, नपुंसक, तरुण बळकट असा पुरुष. यांतून कोणी तरी शकुन भेटेल. या प्रमाणें शकुन जाणावे.

## उत्तमप्रश्नजाहालातर.

मनूचेंवाक्य॥गमनंप्रतिराजंस्तुसन्मुखादर्शनेनच॥ प्रशस्तांश्चैवसंभाषेत्सर्वानेतांश्चकीर्तयेत्॥ ८ ॥

टी०- राजाप्रत सांगतोहे गमन काळीं पूर्वीं शकुन सांगितले ते किंवा उत्तम भाषणें यांचें श्रवण दर्शन न झालें तर मनांत स्मरण करून गमन करावें शुभहोय.

## वारपरत्वें वस्त्रधारण.

रवौ नीलंबुधेपीतंकृष्णवर्णंशनेश्वरे॥श्वेतंगुरौभृगौभौमेरक्तंसोमेतुचित्रकं॥ ९॥

टी०- रविवारीं निळें, बुधवारीं पीत, शनिवारीं काळें, गुरु आणिशुक्रवारींपांढरें, मंगळवारींतांबडें, सोमवारीं चित्र, याप्रमाणें वस्त्र धारण करून गमन करा०

## नक्षत्रतिथिवार परत्वेंदिक्शूलवर्ज्य

### पूर्वदिशा.

मूलश्रवणशाक्रेषुप्रतिपन्नवमीषुच॥शनौसोमेबुधेचैवपूर्वस्यांगमनंत्यजेत्॥

टी०- मूळ- श्रवण. ज्येष्ठानक्षत्र. आणि प्रतिपदा. नवमी. आणि शनि सोम बुधवार यांवर पूर्वेस गमन करूंनये.

## दक्षिणदिशा

पूर्वाभाद्रपदाश्विन्यौपंचमीन्त्रयोदशी॥गुरुर्धनि
ष्ठार्द्रान्चैवयाम्येसप्तविवर्जयेत्॥

टी॰-पूर्वाभाद्रपदा, अश्विनी, आणि तिथी पंचमी, त्रयोदशी, गुरुवार धनिष्ठा, आर्द्रा, ही सात दक्षिण दिशेस गमनास वर्जावीं.

## पश्चिमदिशा

रोहिण्यांचतथापुष्येषष्ठीन्चैवचतुर्दशी॥भौमार्कगु
रुवारेषुनगच्छेत्पश्चिमांदिशं॥

टी॰-रोहिणी आणि पुष्य, षष्ठी चतुर्दशी, मंगळ, रवि, आणि गुरु हे वार यांवर पश्चिम दिशेस गमन वर्जावें.

## उत्तर दिशा.

करेचोत्तरफाल्गुन्योंद्वितीयादशमीतथा॥बुधेरवौ
भौमवारेनगच्छेदुत्तरांदिशं॥

टी॰-हस्त आणि उत्तरा फाल्गुनी, आणि द्वितीया, दशमी, आणि बुध, रवि, भौम, हे वार यांवर उत्तरदिशेस गमन वर्जावें.

## विदिक्शूळ

ईशान्यांज्ञशनौशूळ आग्नेय्यांगुरुसोमयोः॥वा
यव्यांभूमिपुत्रे तुनैर्ऋत्यांशुक्रसूर्ययोः॥

टी॰-वारपरत्वेंशूळ विदिशास असतो ती दिशा त्यावारीं गमनास वर्जावी. बुध आणि शनिवारीं ईशान्य दिशेस गमन वर्जावें. गुरु आणि सोमवारी आग्नेयेस, मंगळवारीं वायव्येस, शुक्र आणि रविवारीं नैर्ऋत्येस गमन वर्जावें

## शूळदोषनिवारणार्थयदार्थभक्षण.

सूर्यवारेघृतंपीत्वागच्छेत्सोमेपयस्तथा॥गुडमंगा
रवारेतुबुधवारेतिलानपि॥गुरुवारेदधिज्ञेयंशुक्र

वारेयवानपि ॥ माषान्भुक्त्वाशनेर्वारेशूलदोषो
पशांतये ॥

टी०-रविवारीं घृत आणि सोमवारीं पय हें प्राशन करावें, मंगळवारीं गूळ आणि बुधवारीं तीळ खावे गुरुवारीं दधिप्राशन, शुक्रवारीं जव खावे, शनिवारीं उडदाचें अन्न भक्षावें; असें वारपरत्वें भक्षण करून गमन करावें.

## कुंभ व मीन चंद्रावर वर्ज्य कर्में

शय्याबितानंप्रेताग्निक्रियाकाष्ठतृणार्जनं ॥ याम्य
दिग्गमनंकुर्यान्नचंद्रेकुंभमीनगे ॥

टी०- पलंग विणणें व प्रेताग्नि कर्म क्रिया व काष्ठ व तृण संगृह आणि दक्षिणेस गमन हीं सकळ कर्में कुंभ आणि मीन राशी च्या चंद्रावर वर्ज करावीं.

सन्मुखचंद्र ॥ करणभगणदोषंवारसंक्रांतिदोषंकु
तिथिकुलिकदोषंयामयामार्धदोषं ॥ कुजशनिरवि
दोषंराहुकेत्वादिदोषंहरतिसकलदोषंचंद्रमासन्मुखस्थः

टी०- करण, नक्षत्र, वार, संक्रांति, कुतिथि, कुलिक, यामार्ध, मंगळ, शनि, रवि, राहु, केतु इत्यादि दोष, सन्मुख चंद्र घेऊन गमन केलें असतां जातात.

## दिशापरत्वें सन्मुखचंद्र.

मेषेचसिंहे धनपूर्वभागेवृषेचकन्यामकरेचयाम्ये ॥
तुलेचकुंभेमिथुनेप्रतीच्यांकर्कालिमीनेदिशिचोत्तर
स्यां ॥ फळांचाश्लोक ॥ सन्मुखोर्थस्यलाभायदक्षिणेसु
खसंपदां ॥ पृष्ठतःप्राणनाशायवामेचंद्रेधनक्षयः ॥

टीका-मेष, सिंह, धन, या राशींचा चंद्र पूर्वेस ॥ वृषभ, कन्या, मकर, या राशींचा चंद्र दक्षिणेस ॥ तूळ, कुंभ, मिथुन, या राशींचा चंद्र पश्चिमेस ॥ कर्क, वृश्चिक, मीन, या राशींचा चंद्र उत्तरेस असतो ॥ फळ ॥ दिशापरत्वें चंद्र सन्मुख घेऊन गमन करावें अर्थ लाभ होय ॥ आणि उजवे कडे घेतला तर धन संपदा प्रा-

ति॥ पृष्ठभागी घेतलातर प्राणनाश होय आणि वामभागीं घेऊन गमन के लें तर धनक्षय असें जाणावें

## काळ वेळा पाहाणें

पूर्वाण्हेचोत्तरांगच्छेत्प्राच्यांमध्यान्हकेतथा॥दक्षिणे अपराण्हेतुपश्चिमेअर्धरात्रके॥

टी॰- दिवसाचे प्रथम प्रहरीं उत्तरेस॥ आणि द्वितीय प्रहरी मध्यान्ही पूर्वेस॥ आणि तृतीय प्रहरीं अपराण्हीं दक्षिणेस॥ आणि अर्धरात्रीं पश्चिमेस गमन करावें उक्त होय

## दिशांपरत्वेंयोगिनी

प्रतिपन्नवमीपूर्वेद्वितीयादशचोत्तरे॥तृतीयैकादशी वन्हौचतुर्द्वादशीनैर्ऋते॥पंचत्रयोदशीयाम्येषष्ठीभूतश्चपश्चिमे॥सप्तमीपूर्णावायव्येअमावास्याष्टमीशिवे॥ ॥फळ॥पृष्ठेचशुभदाप्रोक्तावामेचैवविशेषतः॥योगिनीमाभवेन्नित्यंप्रयाणेशुभदानृणां॥

टी॰- प्रतिपदा, नवमी, या तिथींस योगिनी पूर्वेस॥ द्वितीया, दशमीस उत्तरेस दतीया एकादशीस आग्नेयेस, चतुर्थी,द्वादशी, नैर्ऋत्येस, पंचमी,त्रयोदशी, दक्षिणेस षष्ठी,चतुर्दशी, पश्चिमेस सप्तमी,पौर्णिमा,वायव्येस. आणि अमावास्या अष्टमी ईशान्येस. याप्रमाणें योगिनी जाणाव्या॥ याचेंफळ॥ योगिनी पृष्ठभागीं अथवा वामभागीं घेऊन गमन नित्यानित्य करावें शुभहोय॥

## वारपरत्वेंकाळराहु

अर्कोत्तरेवायुदिशाचसोमेभौमेप्रतीच्यांबुधनैर्ऋतेच॥ याम्येगुरौवन्हिदिशाचशुक्रेमंदेचपूर्वेप्रवदंतिकालं॥

टी॰- रविवारी काळउत्तरेस॥सोमवारीं वायव्येस॥ मंगळवारीं पश्चिमेस॥ बुधवारीं नैर्ऋत्येस॥ गुरुवारीं दक्षिणेस शुक्रवारीं आग्नेयेस॥शनिवारीं पू-

वेंस या प्रमाणें काळराहु वार परत्वें जाणावा.

फळांचा श्लोक ॥ रविदिनगुरु पूर्वे सोमशुक्रेच याम्ये वरुणदिशितु भौमे चोत्तरे सौरिसंस्थे ॥ प्रतिदिनमिति गत्वा काळराहु दिशानां सकळगमनकार्ये वामपृष्ठेच सिद्धिः ॥

टी०-रवि अथवा गुरु या वारीं पूर्वेस गमन केलें असतां काळराहु वामपृष्ठभागीं येतो सकळ कार्ये सिद्धीस जातात. सोम आणि शुक्रवारीं दक्षिणेस गमन करावें. भौमवारीं पश्चिमेस. शनिवारीं उत्तरेस गमन करावें कार्य सिद्धि होते.

क्षुधितराहु ॥ इंद्रे वायौ यमे रुद्रे तोये ग्नौ शशिरक्षसोः ॥ यामार्धे क्षुधितो राहुर्भ्रमस्येव दिगष्टके ॥ नतिथिर्नच नक्षत्रं नयोगो नच चंद्रमाः ॥ सिध्यंति सर्वकार्याणि यात्रायां दक्षिणे रवौ ॥

टी०-प्रथम यामार्धी क्षुधितराहु पूर्वेस असतो, द्वितीय वायव्येस,॥ तृतीय दक्षिणेस, चतुर्थ ईशान्येस, पंचम पश्चिमेस, षष्ठ अग्नेयेस, सप्तम उत्तरेस, अष्टम यामार्धी नैर्ऋत्येस, या प्रमाणें अष्टदिशा भ्रमण करितो. परंतु दक्षिण भागीं रवि घेऊन गमन केलें असतां तिथिनक्षत्रादि दोष जातात.

काळ कोठें आहे तो पाहावा.

काळं पलं घातक लोह पात वडवानलः खड्ग कचोलकांतिकाः ॥ नखाश्चतुर्विंशति शट्ट तथादिकुरुद्रा धृति वेदगुणाः क्रमेण ॥ तिथ्यायुतं वेवस्कृभाजितं च शेषं च कालं मुनयो वदंति ॥ फळांचा श्लोक ॥ काळं नपृष्ठे पलं सन्मुखेच घातं च लोहं वडवा च पृष्ठे ॥ खड्गं च याम्ये कचचं च वामे कांतिश्च योज्या दिशि दक्षिणस्था ॥

टी०— कालांचीनांवें ।। १ काल २ धूम्र ३ पातक ४ लोहपात ५ वडवानल ६ खड्ग ७ कवच ८ कांति ।। अशी आठ नांवें त्यांचे खालीं अंक मांडले आहेत ते ज्या तिथीस गमन करायाचें असेल ती तिथ एकेक अंकांत मिळवून आठांनी भागून शेषले अंक उरतील त्या दिशेस तो काळ आहे, अशा क्रमानें पूर्वादि अष्ट दिशास पाहावे, पृष्ठभागी काळ शुभ. सन्मुख धूम्र शुभ, पृष्ठभागीं घातक, लोहपात आणि वडवानल हे तिन्ही शुभ. अग्रभागी खड्ग शुभ वामभागीं कवच शुभ, आणि दक्षिणभागी कांति शुभ. अशी दिशापरत्वें शुभ पे ऊन त्या दिशेस युद्धांत अथवा यात्रादि कार्यास गमन करावें कार्यसिद्धि होईल.

## पंथा राहुचक्र

स्युर्धर्मे दस्रपुष्योरगवसुजलप द्वीशमैत्राण्यथार्थे याम्याजों घ्रीं दुकर्णादितिपितृपवनोडून्यथो भानि कामे।। वन्ह्यार्द्रा बुध्न्यचित्रानिर्ऋतिविधिभगाख्यानि मोक्षेथरोहिण्यर्यम्णांब्जेंदुविश्वांतिमभदिनकर क्षाणि पंथादिराहो ।।

| धर्म | आश्वि | पुष्य | आश्लेषा | विशाखा | अनुरा | धनिष्ठा | शततारका |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अर्थ | भरणी | पुनर्वसु | मघा | स्वाती | ज्येष्ठा | श्रवण | पूर्वाभा० |
| काम | कृत्तिका | आरद्रा | पूर्वा | चित्रा | मूळ | अभिजित् | उत्तरा |
| मोक्ष | रोहिणी | मृग | उत्तरा | हस्त | पूर्वाषा | उत्तराषा | रेवती |

टी०— नक्षत्रें २८ त्यांचे भाग ४, त्यांचीं नांवें प्रथम भाग धर्म मार्गाचीं नक्षत्रें ७, द्वितीय अर्थ मार्गाचीं नक्षत्रें ७, तृतीय काम मार्गाचीं ७, चतुर्थ मोक्ष मार्गाचीं ७ याप्रमाणें चहूं मार्गाचीं नक्षत्रें जाणावीं. त्यांत एके मार्गाचे नक्षत्री सूर्य असतां चंद्र दोहों मार्गाचे नक्षत्रीं फिरेल त्याचीं फळें सांगतों.

## धर्ममार्गाचीं फळें

धर्ममार्गे गते सूर्ये अर्थांशे चंद्रमा यदि ॥ तदा शत्रुभ
यं तस्य ज्ञेयं तु विबुधैः शुभं ॥ १ ॥

टी० – धर्म मार्ग नक्षत्रीं सूर्य असतां व अर्थमार्ग नक्षत्रीं चंद्र आला असतां गमन केलें तर मार्गाचे ठायीं शत्रुभय होईल. अशुभ फळ जाणावें.

धर्ममार्गे गते सूर्ये चंद्रे तत्रैव संस्थिते ॥ संहारश्च भवेत्तत्र
भंगो हानिः प्रजायते ॥ २ ॥

टी० – धर्ममार्ग नक्षत्रीं सूर्य असतां व चंद्र असतां गमन केलें तर संहार आणि भंग व हानि असें प्राप्त होईल

धर्ममार्गे गते सूर्ये कामांशे चंद्रमा यदि ॥ विग्रहो दारु
णश्चैव चोराकुलसमुद्भवं ॥ ३ ॥

टी० – धर्ममार्गी सूर्य आणि काममार्ग नक्षत्रीं चंद्र, असें योगाचें फळ वैर पुष्कळाशीं होईल. आणि चोरांचें भय प्राप्त होईल.

धर्ममार्गे गते सूर्ये चंद्रे मोक्ष गते यदि ॥ गृहलाभो भ
वेत्तस्य विज्ञेयो नात्र संशयः ॥ ४ ॥

टी० – धर्ममार्गी सूर्य, चंद्र मोक्षमार्गी, असें योगाचें फळ, गृहलाभ आणि मार्गीं सुख पावेल.

---

## अर्थमार्गाचीं फळें.

अर्थमार्गे गते सूर्ये चंद्रे धर्मस्थिते यदि ॥ गजलाभो
भवेत्तस्य तत्र श्रीः सर्वतः सुखी ॥ १ ॥

टी० – अर्थमार्गी सूर्य आणि चंद्र धर्ममार्ग नक्षत्रीं. आशा योगाचें फळ गज लाभ आणि लक्ष्मी प्राप्ति ॥ आणि सर्वदा सुखी होईल.

अर्थमार्गे गते सूर्ये चंद्रे तत्रैव संस्थिते ॥ प्रथमं जायते का

येंतत्रभंगोभविष्यति ॥२॥

टी०- अर्थमार्गी सूर्य आणि चंद्र आला तर अशायोगानें फळ प्रथम कार्य होईल नंतर भग पावेल ॥

अर्थमार्गेगतेसूर्येचंद्रेकामांशसंस्थिते ॥सर्वसिद्धि भर्वेत्तस्यजानीयान्नात्र संशयः॥३॥

टी०- अर्थ मार्गी सूर्य आणि काम मार्गी चंद्र आलातर आशा योगानें फळ सर्व कार्य सिद्ध होईल॥

अर्थमार्गेगतेसूर्येचंद्रेमोक्षस्थितेयदि॥भूमिलाभो भवेत्तस्यहर्षयुक्तःसुखीभवेत् ॥४॥

टी०- अर्थमार्गी सूर्य आणि मोक्षमार्गी चंद्र, अशायोगानें फळ भुमिलाभ व हर्षयुक्त व सुख, मार्गाचें ठाई पावेल

## काम मार्गाचीं फळें

काममार्गेगतेसूर्येचंद्रेधर्मेचसंस्थिते॥ गजाश्वाश्च विलभयतेराजसन्मानसंभवात्॥१॥

टी०- काम मार्गी सूर्य आणि धर्म मार्गी चंद्र आलातर हत्ती घोडे यांचा लाभ आणि राजाकडे सन्मान होईल

काममार्गेगतेसूर्येचंद्रेचैवार्थसंस्थिते।।सकलंजायते तस्य विघ्नभंगोविनिर्दिशेत्॥२॥

टी०- काममार्गी सूर्य आणि अर्थमार्गी चंद्र आला असतां सकळविघ्ने नाश पावतील ॥

काममार्गेगतेसूर्येचंद्रेतत्रैवसंस्थिते॥विग्रहंदारुणं चैवकार्यनाशंविनिर्दिशेत् ॥३॥

टी०- काममार्गी सूर्य आणि चंद्र आले तर वैर फार व कार्यनाश होईल

काममार्गेगतेसूर्येचंद्रेमोक्षगतेपिवा॥राज्ञोलाभो

भवेत्तस्यस्वर्णलाभंविनिर्दिशेत् ॥ ४ ॥

टी०-काममार्गी सूर्य व मोक्ष मार्गी चंद्र आला तर राजापासून लाभ व सुवर्णलाभ हो०

## मोक्षमार्गाचीं फळें.

मोक्षमार्गेगतेसूर्येचंद्रेधर्मस्थितेयदि ॥ हेमलाभो भवेत्तस्यसर्वकार्यंप्रसिध्यति ॥ १ ॥

टी०-मोक्षमार्गी सूर्य व धर्ममार्गी चंद्र, तर हेमलाभ आणि सर्वसिद्धि.

मोक्षमार्गेगतेसूर्ये अर्थांशेचंद्रमायदि ॥ विफलंतस्य कार्यंचचोरराजरिपोर्भयं ॥ २ ॥

टी०-मोक्षमार्गी सूर्य व अर्थमार्गी चंद्र आहे तर राजा व चोर व रिपु यांचें भ०

मोक्षमार्गेगतेसूर्येचंद्रेकामस्थितेयदि ॥ सर्वसिद्धिम वाप्नोतिकार्येचजयमेवच ॥ ३ ॥

टी०-मोक्षमार्गी सूर्य व काममार्गी चंद्र तर सर्वकार्यसिद्धि व जय प्राप्त.

मोक्षमार्गेगतेसूर्येचंद्रेतत्रैवसंस्थिते ॥ विग्रहंदारुणंचैव विघ्नस्तत्रभविष्यति ॥ ४ ॥

टी०-मोक्षमार्गी सूर्य व चंद्र आहे तर वैर आणि नानाप्रकारें विघ्नें प्राप्त होतील.

## पंथाराहूवरकर्मेंकरावयाचीं.

यात्रायुद्धे विवाहेचप्रवेशेनगरादिषु ॥ व्यापारेषुचस र्वेषुपंथाराहुः प्रशस्यते ॥ १ ॥

टी०-यात्रेस आणि युद्धांत व विवाहास व नगरादिकांत तसेंच सर्व व्यापारांत प्रवेश करणें यांस पंथा राहु प्रशस्त होय.

## गर्गादिकांचामुहूर्त.

उषःप्रशस्यतेगर्गःशकुनंचबृहस्पतिः ॥ अंगिरामन उत्साहं विप्रवाक्यंजनार्दनः ॥ १ ॥

टी०-मागील ५ घटिका रात्र शेष उरली म्हणजे उषःकाल होतो तो, गर्गमु

नीचे मते शुभ ॥ आणि बृहस्पतीच्या मतें उत्तम शकुन शुभ ॥ अंगिराच्या मते मनोत्साह कार्यी शुभ ॥ आणि जनार्दन मतें विप्रवाक्यें शुभ होय.

## शुभाशुभवाहनें.

आत्मनोजन्मनक्षत्राद्दिननक्षत्रमेवच ॥ एकीकृत्य हरेद्भागंनंदशेषेचवाहनं ॥ १ ॥ रासभोश्वोगजोमेषोजंबुकःसिंहसंज्ञकः ॥ काकश्चैवमयूरश्चहंसइत्येववाहनं ॥ २ ॥ फल ॥ रासभे अर्थनाशश्च धनलाभश्चवाजिनि ॥ लक्ष्मीप्राप्तिर्गजाख्येहिमेषेचमरणंध्रुवं ॥ ३ ॥ जंबुकेस्वल्पलाभश्चसर्वसिद्धिश्चसिंहके ॥ काकेच निष्फलं कार्यं मयूरे चरुखंबहु ॥ ४ ॥ हंसेतु सर्वसिद्धिःस्यात्वाहनानां फलं स्मृतं ॥

टी॰- आपले जन्मनक्षत्रा पासून दिवस नक्षत्रा पावेतो मोजून नवानी भागावे ॥ शेष उरेल ते वाहन जाणावें ॥ शेष १ उरेतर वाहन गाढव, त्याचे फळ अर्थनाश ॥ २ उरेतर घोडा, धनलाभ ॥ ३ उरेतर हत्ती, लक्ष्मीप्राप्ति ॥ ४ उरेतर मेंढा, मरण ॥ ५ उरेतर कोल्हा, स्वल्पलाभ ॥ ६ उरेतर सिंह, कार्य सिद्धि ॥ ७ उरेतर कावळा, निष्फळ ॥ ८ उरेतर मयूर, सुखप्राप्ति ॥ ९ आलेतर हंस. सर्व सिद्धि ॥ याप्रमाणें वाहनें व फळें जाणावीं.

---

## त्र्यंकमुहूर्त.

तिथयःपक्षगुणितासप्तभिर्भाजितास्तथा ॥ वारास्तुर्वह्निगुणितावसुभिश्चैवभाजिताः ॥ १ ॥ चतुर्गुण्यानिभान्यंगभाजितानियथाक्रमं ॥

टी॰- ज्या तिथीस गमन करावयाचें ती तिथि दुप्पट करून सातांनी भागावी आणि जो वार असेल तो तिप्पट करून आठांनीं भागावा ॥ आणि जे नक्ष-

त्र असेल तें चौपट करून साहांनी भागावें ॥ शेषांक तिहींचे आले तर शुभ। हींचें शून्य आलें तर अंक नाहीं असें जाणावें.

फळश्रुति ॥ पीडास्यात्प्रथमे शून्ये मध्ये शून्ये महद्भयं ॥ अंत्य शून्ये तु मरणं अंके च विजयो भवेत् ॥

टी०- प्रथम तिथीचे भागास शून्य आलें तर पीडा. द्वितीय वाराचे भागास शून्य आलें तर मोठें भय, तिसरे नक्षत्र भागास शून्य आलें तर मरण॥ आणि तिहीं ठिकाणीं अंक आले ह्मणजे अंक विजय प्राप्त होय.

## भ्रमणाडळ मुहूर्त

सूर्यभाद्गणयेच्चांद्रं सप्तभिर्भागमाहरेत् ॥ त्रिषड्भ्रमणं चैव द्विसप्तमहदाडळं ॥ १ ॥ प्रथमं पंचचत्वारि आडळो नास्ति निश्चितं ॥ आडळे ताडनं प्रोक्तं भ्रमणे कार्यनाशनं ॥ २ ॥

टी०- सूर्यनक्षत्रापासून दिवस नक्षत्रापावेतों गणावें आणि सातांनीं भागावें शेष तीन अथवा साहा उरले तर त्या दिवशीं भ्रमण आहे, कार्यनाश॥ २ अथवा ७ उरले तर आडळ आहे तें गमनास वर्ज्य॥ ताडण करण्यास उक्त- १ अथवा ५, व ४ असे उरले तर आडळ नाहीं. गमनास उक्त जाणावें.

## हैवर मुहूर्त

सूर्यभाद्गणयेच्चांद्रं पक्षादितिथिवारयुक् ॥ नवभिस्तु हरेद्भागं सप्त शेषं तु हैवरं ॥ १ ॥

टी०-सूर्यनक्षत्रापासून दिवस नक्षत्रापावेतों मोजावें त्यांत पक्षतिथिवार मिळवून नवांनी भागावें, शेष सात अंक उरले तर हैवर मुहूर्त आहे, गमनास शुभ होय॥

## घबाड मुहूर्त.

सूर्यभाद्गणयेच्चांद्रं त्रिगुणं तिथिमिश्रितं ॥ नवभिस्तु

हरेद्भागंत्रिशेषःस्याद्भवाडकं ॥ १ ॥

टी०-सूर्यनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापावेतों गणून त्रिगुणित करून चालती तिथि आंत मिळवून नवांनी भागावें २ शेषउरलेतर पवाडमुहूर्त

## वारपरत्वेस्वरशकुन

गुरौशनौरवौभौमेशुभोवैदक्षिणःस्वरः ॥ अन्यथा रेषुवामस्तुस्वरश्चैवशुभःस्मृतः ॥ १ ॥ निर्गमेवामतः श्रेष्ठः प्रवेशेदक्षिणःशुभः ॥ यःस्वरःसचनासाग्रे योगीनांमतमीदृशं ॥ २ ॥

टी०- गुरु, शनि, रवि, भौम, याचोहोंवारीं आपले नासिकेचा दक्षिणस्वर वाहात असता प्रवेश करण्यास श्रेष्ठ होय आणि चंद्र बुध शुक्र या तिहीं वारी वामस्वर वाहत असतां निर्गमास श्रेष्ठ असें योग्याचें मत आहे असें जाणावें

## वारपरत्वेंछायाशकुन

अष्टोपादाबुधेस्युर्नवधरणिसुतेसप्तजीवेपदानिज्ञे यचैकादशार्केशनिशशिभृगुषुप्रोक्तमर्थंचतुष्कं ॥ न स्मिन्कालेमुहूर्त्तेसकळगुणयुतेकार्यसिद्धिःशुभोक्ता नास्मिन्पंचांगशुद्धिर्नखलुशशिबलंभाषितंगर्गमुख्यैः ॥

टी०- आठपावलें आपली छाया आली ह्मणजे बुधवारी गमन करावें ॥ नऊ पावलें आली ह्मणजे मंगळवारी ॥ सातपावलें गुरुवारीं ॥ अकरापावलें आली ह्मणजे रवि, शनि, सोम, शुक्र, याचोहोंवारीं गमन करावें, हा मुहूर्त सकळ गुणयुक्त सर्व कार्य सिद्धि कर्त्ता आहे, असे गर्गादिकमुनीनीं सांगितले.

## काकशब्दशकुन.

काकस्यवचनंश्रुत्वापादछायांतुकारयेत् ॥ त्रयोदश युतांकृत्वाषड्भिर्वैभागमाहरेत् ॥ फळश्लोक ॥ लाभःस्ये

दस्तथासौख्यंभोजनंचधनागमः॥ अशुभंचक्रमे
णैवगर्गस्यवचनंतथा॥ २॥

टी०— काकशब्द ऐकून आपली छाया पादें करून मोजून त्यांत १३ मिळवावे आणि ६नी भागावें शेष राहील त्याचें फळ, १ उरेतर लाभ, २ उरेतर खेद, ३ उरेतर सौख्य, ४ उरेतर भोजन, ५ उरेतर धनलाभ, शून्य आलेंतर अशुभ जाणावें॥ याप्रमाणे गर्गवचन प्रमाण आहे.

## पिंगला शब्दशकुन.

उल्हासः किल्बिलेन्वैचचिल्पिल्याभोजनंतथा॥ बंधनं
खिटखिटिस्यात्कुर्कुशब्दैर्महद्भयं॥ १॥

टी०- किल्बिल शब्दझालातर उल्हास होय॥ आणि चिल्पिल शब्दझाला असतां भोजन प्राप्त होय॥ खिटखिट शब्दझाला तर बंधन होय॥ आणि कुर्कुशब्दझालातर महाभय असें जाणावें॥

---

## शिंकापरत्वें पादछायाशकुन.

बुधैश्छिंकारवंश्रुत्वापादछायांचकारयेत्॥ त्रयोदश
युतांकृत्वाचाष्टभिर्भागमाहरेत्॥ फळश्लोक॥ ला
भःसिद्धिर्हानिशोकौभयंश्रीर्दुःखनिःफले॥ क्रमेणै
वंफलंज्ञेयंगर्गेणचयथोदितं॥ २॥

टी०—शिंकाशब्द ऐकून आपली छाया पादें करून मोजून त्यांत १३ मिळऊन ८नी भागावें शेष राहील त्याचें फळ॥ १ उरेतर लाभ, २ उरेतर सिद्धि, ३ उरेतर हानि, ४ उरेतर शोक, ५ उरेतर भय, ६ उरेतर लक्ष्मी, ७ उरेतर दुःख ० उरेतर निष्फळ असें गर्गमुनी सांगतात॥

## शिंकाशकुन

छिंकाप्रश्नंप्रवक्ष्यामिपूर्वस्यामशुभंफलं॥ आग्ने

ग्न्यांशोकदुःखंस्यादरिष्टंदक्षिणेतथा॥नैर्ऋत्यांच शुभंप्रोक्तंपश्चिमेमिष्टभक्षणं॥वायव्येधनलाभस्तु उत्तरेकलहस्तथा॥२॥ईशान्यांचशुभंज्ञेयमाखछि क्काम हद्भयं॥उर्ध्वेचैवशुभंज्ञेयंमध्येचैवमहद्भयं॥ ॥३॥आसनेशयनेचैवदानेचैवतुभोजने॥वामांगेपृ ष्टनश्चैवपट्छिकाश्चशुभावहाः॥४॥

टी०– दिशापरत्वे शिंकेचीं फळे॥पूर्वेची शिंका अशुभ, आग्नेयेची शोक व दुःखकारक॥ दक्षिणेची अरिष्टकारिणी॥नैर्ऋत्येची शुभ॥ पश्चिमेची मिष्टान्नभक्षण॥वायव्येची धनदायक॥उत्तरेचीकलह॥ ईशान्येची शु भकारक॥ आखू शिंकेचें मोठें भय, ऊर्ध्वआलीतर शुभ॥ मध्ये आलीत रमोठेंभय॥ आसनावर अथवा शयनस्थानावर व दानदेता किंवा भोज नकातांअथवा वाम भागीं किंवा पृष्ठभागी त्यासाहास्थानाची शुभहोय

## पल्लीशब्दशकुन

वित्तंब्रह्मणिकार्यसिद्धिमतुलांशक्रेहुताशेभयंयाम्ये मित्रवधःक्षयश्चनिर्ऋतेलाभःसमुद्रालये॥वायव्यां वरमिष्टमन्नमशनंसौम्यार्थलाभस्तथाईशानेगृहगो धिकार्यमतुलंसर्वत्रभूमौभयं॥१॥

टी०–पल्लीशब्दानें दिशापरत्वें फळें॥ऊर्ध्वदिशेस लक्ष्मीप्राप्ति॥ पूर्वेसका र्यसिद्धि॥आग्नेयेसभय॥दक्षिणेस मित्रवध॥ नैर्ऋत्येस क्षय॥ पश्चिमेस लाभ॥वायव्येस मिष्टान्नभोजन॥उत्तरेस लाभ॥ईशान्येसकार्य सिद्धि॥ भूमीवर शब्दझाला असतां भय॥ याप्रमाणें फळजाणावें

## पल्लीपतन व सरठारोहण.

राज्यंतुशिरसिज्ञेयंललाटेबंधुदर्शनं॥भ्रूमध्येराज्ञ सन्मानमुत्तरोष्ठेधनक्षयं॥१॥अधरोष्ठेधनैश्वर्यंना

सांतेव्याधिपीडनं॥आयुष्यंदक्षिणेकर्णेबहुलाभस्तु
वामके॥२॥अक्ष्णोस्तुबंधनंज्ञेयंभुजेभूपतितुल्यता॥
राजक्षोभंतथावामेकंठेशत्रुविनाशनं॥३॥स्तनद्वयेच
दुर्भाग्यमुदरेमंडनंशुभं॥प्रज्ञानाशःपृष्ठदेशेजानुजंघे
शुभावहं॥४॥करद्वयेवस्त्रलाभःस्कंधयोर्विजयीभवे
त्॥नाभौबहुधनंप्रोक्तमूर्वोश्चैवहयादिकं॥५॥दक्षि
णेमणिबंधेचमनस्तापंधनक्षयं॥मणिबंधेतथावामे
कीर्तिवृद्धिधनप्रदं॥६॥नखेषुधान्यलाभंचचक्रेमि
ष्टान्नभोजनं॥गुल्फयोर्बंधनंज्ञेयंकेशांतेमरणंध्रुवं॥
७॥अध्वातुदक्षिणेपादेवामेबंधुविनाशनं॥स्त्रीना
शःस्यात्पादमध्येपादांतेमरणंभवेत्॥८॥पल्याः
प्रपतनेज्ञेयंसरठस्याधिरोहणे॥यात्रोद्युक्तमनुष्य
स्यैतच्छुभाशुभसूचकं॥९॥तिलमाषादिदानंचस्ना
स्वादेयंद्विजन्मने॥पिनाकिनंनमस्कृत्यजपेन्मंत्रंषड
क्षरं॥१०॥शतंसहस्रमथवासर्वदोषनिबर्हणं॥शि
वालयेप्रदद्याद्वैदीपंदोषोपशांतये॥११॥

टी०-मनुष्य गमनास उद्युक्त होत्साता अंगावर पल्लीपतन अथवा सर
डारोहण झालें नर शुभाशुभ सूचक स्थान परत्वें फळें सांगतो॥

॥शरीरस्थानपरत्वें शुभाशुभफळें॥

| | | |
|---|---|---|
| १ शीर्ष-राजप्राप्ति | ६ नासिकांतीं-व्याधिपीडा | ११ वामबाहु-राजक्षोभ |
| २ कपाळ-बंधुदर्शन | ७ उजवाकान-आयुष्य | १२ कंठावर-शत्रुनाश |
| ३ भिंवया-राजसन्मान | ८ डावाकान-बहुलाभ | १३ स्तनावर-दुर्भाग्य |
| ४ वरीलओंठ-धनक्षय | ९ नेत्रांवर-बंधन | १४ उदरावर-शुभमंडण |
| ५ खालचाओंठ-धनऐश्वर्य | १० बाहूंवर-राजाप्रमाणें | १५ पृष्ठीवर-बुद्धिनाश |

| | | |
|---|---|---|
| १६ दोपर- शुभ | २१ मांड्या घोडावाहन | २६ उरूवर धन |
| १७ पोटऱ्या- शुभ | २२ उजवामणिबंध धनक्षय | २७ केशांवर- नग्न |
| १८ दोन्हीहात वस्त्रलाभ | २३ डावामणिबंध कीर्तीध नप्रद | २८ दक्षिणपाद मार्गचालणे |
| १९ खाद्यावर विजय | २४ नखांवर- धान्यलाभ | २९ वामपाद- बंधुनाश |
| २० नाभि शत्रुधन | २५ मुखावर मिष्टान्नभोजन | ३० पायाचाम- स्त्रीनाश |
| | | ३१ पादाचा अं० मरण |

पाल अंगावर पडली असता सचैलस्नान करून नीळ उडीद यांचीं दानें ब्राह्मणांस द्यावीं ॥ आणि मावास नमस्कार करून शिवमंत्राचा जप अकराशें करावा आणि शिवालयांत दीपलावावा ह्म० दोष जातो.

## अंगस्फुरणा० मनुमत्स्यसंवाद.

मनुरुवाच ब्रूहिमेत्वं निमित्तानि अशुभानिशुभानिच॥ सर्वधर्मभृतांश्रेष्ठत्वंहिसर्वंविबुध्यसे ॥१॥ अंगानांस्पंदनंचैवशुभाशुभविचेष्टितं ॥ तन्मे विस्तरतोब्रूहियेनस्यात्तद्विधंभुवि ॥२॥

टी०- मनु मत्स्याप्रत प्रश्न करितो हे हे धर्मश्रेष्ठा अंगस्फुरणा विषयी निमित्तें शुभसूचक व अशुभ सूचक कोणतीं आहेत तीं विस्तारें करून सांग अशी कीं लोका मध्ये तसा अनुभव यावा कारण तूं सर्वज्ञ आहेस

मत्स्यउवाच ॥ अंगस्यदक्षिणेभागेप्रशस्तंस्फुरणंभवेत् ॥ अप्रशस्तंतथापृष्ठे हृदयेचतथैवच ॥ ३ ॥ पृथ्वीलाभोभवेन्मूर्ध्नि ललाटे रविनंदन ॥ स्थानं विवृद्धिमायातिभ्रूनसोः प्रियसंगमः ॥४ ॥ भृत्यलब्धिश्चाक्षिदेशे दृगुपांते धनागमः ॥ उत्कंठोपगमे मध्ये दृष्टे राज्यं विचक्षणे ॥५॥ दृग्बंधने संगरेचजय- शीघ्रमवाप्नुयात् ॥ योषिल्लाभोपांगदेशेश्रवणांते प्रियश्रुतिः ॥६॥ नासिकायांप्रीति

सौख्यंप्रियाप्तिरधरोष्ठयोः॥ कंठेतुभोगलाभः स्याद्भोगवृद्धिरथांसयोः॥ ७॥सुहृत्स्नेहश्चबाहुभ्यां हस्ते चैवधनागमः॥ पृष्ठेपराजयोत्से धोजयोवक्षस्थले भवेत्॥ ८॥कुक्षिभ्यांप्रीतिरुद्दिष्टास्त्रियाःप्रजननंभगे॥स्थानभ्रंशोनाभिदेशेआंत्रेचैवधनागमः॥ ९॥जानुसंधौपरैःसंधिर्बलवद्भिर्भवेन्नृप॥दशैकदेशेनाथोयंजंघाभ्यांरविनंदन॥ १०॥उत्तमस्थानमाप्नोतिपद्भ्यांप्रस्फुरणेनृप॥अलाभंचाध्वगमनंभवेत्पादतले नृप॥ ११॥ ॥ ७॥ ॥ ७॥ ॥

टी०—मत्स्यसांगतो हे सूर्यपुत्रा अंगस्फुरण दक्षिणभागीं शुभ. वामभागीं तसें पृष्ठ आणि हृदयभागीं अशुभ जाणावें; या प्रमाणें मूर्धादिस्थानीं फळें खालीं लिहिल्या प्रमाणें जाणावीं.

## स्थानें व फळें

| | |
|---|---|
| १ मस्तकस्फुरण - पृथ्वीलाभ | १४ दोन्हीबाहु - सुहृत्स्नेही भेटतील. |
| २ ललाट - स्थानाची वृद्धि | १५ दोन्हीहात - धनप्राप्ति |
| ३ भिंवयांचेंमध्य - प्रियाची भेट | १६ पृष्ठ - दुसऱ्यापासोनजय होईल |
| ४ नेत्रांजवळ - चाकर मिळतील | १७ उर - जयप्राप्ति |
| ५ पापण्या स्फु० - धनप्राप्ति | १८ कुक्षि - प्रीति |
| ६ कंठमध्य - राज्यप्राप्ति | १९ शिश्न - स्त्रियाप्राप्त० |
| ७ दृग्बंधन - युद्धांतजाणें होईल, जय० | २० नाभि - स्थान भ्रंश |
| ८ अपांगदेश - स्त्रीलाभ | २१ आंतडि - धनप्राप्ति |
| ९ कर्ण - प्रीतीचीभाषणें ऐकूंयेतील | २२ {दोंपेसंधी. / उपसंधी.} - बलवान शत्रूंशीं संधि |
| १० नासिक - प्रीतिसौख्यप्राप्त | २३ पोटऱ्या - एकेदेशाचास्वामी होईल. |
| ११ अधरोष्ठ - प्रियकरवस्तुप्राप्तहोय | २४ पाय - उत्तमस्थानीं मान्यताहोईल. |
| १२ कंठ - ऐश्वर्यप्राप्ति | २५ तळवे पायांचे - गमन होय |
| १३ खांदे भोगवृद्धिप्राप्तहोईल | |

## स्त्रियांचें अंगस्फुरण.

लांछनंपीठकेचैवज्ञेयःस्फुरणवत्तथा ॥ विपर्ययेणवि
हितः सर्वस्त्रीणांविपर्ययः ॥१॥ दक्षिणेपिप्रशस्तेंगप्र
शस्तंस्याद्विशेषतः ॥

टी०- स्त्रियांचें अंगस्फुरण, स्त्रियामध्यें गोधळें कादिनात तें स्थान शुभ तरीच हीं सर्व मागें स्फुरणस्थानें सांगितली परंतु तीन स्थाने स्त्रियांस विपरीत धरून सांगावीं ॥ स्त्रियांचे वामांग शुभ आहे.

अंगस्फुरणोद्भूतं रिष्टं सकलं विनाशयति सद्यः ॥ द्विजसं
तर्पणमथवा कांचनदानं द्विजाय भूमिपते ॥

टी०-हे राजा अनिष्ट फळांचें निवारण ब्राह्मण संतर्पण वसुवर्णदान करावें म्हणजे दोषपरिहार होतात

## नेत्रस्फुरण.

नेत्रस्योर्ध्वं हरतिसकलं मानसंदुःखजालं नेत्रोपांते दि
शतिचधनंनासिकांतेचमृत्युं ॥ नेत्रस्याधःस्फुरणनस
कृत्संगरेभंगहेतुर्वामेचैतत्फलमविफलं दक्षिणेवैपरीत्यं ॥

टी०-नेत्रांचीऊर्ध्वभागादिस्थानें स्फुरण होतात त्याचीं फळें सांगतों. नेत्रांचा वरील पापण्या स्फुरण झाल्यावर मनाचें दुःख जाईल आणि धनप्राप्ति होय नासिका जवळची स्फुरण झालीतर मृत्यु, अधर भागस्फु० झाल्यातर युद्धांत अपजय, हीं सर्व फळें वामनेत्राची घ्यावीं दक्षिणनेत्राचीं निष्फळ आणि स्त्रियाचीं दक्षीण नेत्राचीं घ्यावी वामनेत्राचीं विफळ

## त्रिशूळयंत्र.

रोगेकुजर्क्षतश्चाद्रंगमनेऽन्यर्क्षतस्तथा ॥ अन्यस्मि
ञ्छुभकार्येतुसूर्यर्क्षाद्गणयेत्सुधीः ॥ युद्धेतुचंद्रनक्षत्रा
द्रविभंगणयेत्तथा ॥ त्रिशूलयंत्रतोज्ञेयंफलमेतच्छुभाशुभं ॥

टी०- रोग्याचे प्रश्नास त्रिशूळमध्याग्रीं मंगळ ज्या नक्षत्रीं असेल तें घ्यावें आणि चंद्र ज्यास्थानीं यंत्रांत येईल तें फळ घ्यावें त्या क्रमानें पुढील क्रम जाणावा. युद्धांत जाणें तर दिननक्षत्रापासोन सूर्यनक्षत्रां पावेतों. आणि गमन करणें तर कृत्तिकापासून दिवसनक्षत्रापावेतों आणि अन्य क्रमास सूर्यनक्षत्रापासून दिननक्षत्रापावेतों असा क्रम जाणावा.




त्रिशूलाग्रे भवेन्मृत्युर्मध्यमं बहिरष्टकम्॥ लाभं क्षेमं जयारोग्यमंतर्गर्भेषु संमतं ॥१॥

टी०-त्रिशूल अग्रभागीं दिननक्षत्र आलें तर मृत्यु आणि बाहेरील अष्टकांत आलें तर मध्यम, मध्याष्टकांत आलें तर लाभ, क्षेम जय आरोग्य हें सर्व सम्मत जाणावें.

### गमनास लग्नें.

चरलग्ने प्रयातव्यं द्विस्वभावे तथा नरैः॥ लग्ने स्थिरे न गंतव्यं यात्रायां क्षेममीप्सुभिः ॥ ॥

टी० चर ल्ग्न० मेष कर्क तूळ मकर हीं चार लग्नें आणि द्विस्वभाव ल्ग्न० मि-

थुन, कन्या, धन, मीन, हीं चार, अशीं ८ लग्नें गमनास उक्त होत, कार्यस फल होय, शेष लग्नें स्थिर राहिलीं तीं वर्जावीं

लग्न

दुसरा प्रकार — लग्ने कार्मुक मेषतौलि निगते कार्यैवि लंबोनृणां पंचत्वं मकरे तथैव च घटे तद्वत् लं वृश्चिके ॥ सिंहे कर्कटके वृषे परिगतः सर्वार्थ सिद्धिं लभेत्कन्या मीनगतस्तथैव मिथुने सौख्यं शुभान्नंवसु ॥

टी॰ — धन, मेष, तूळ, या तीही लग्नीं गमन केलें तर कार्य विलंबें करून होईल आणि मकर कुंभ वृश्चिक हीं लग्नें मृत्युकारक सिंह, कर्क, वृषभ, ही कार्य सिद्धि करणारीं होत. कन्या, मीन, मिथुन, हीं तिन्ही लग्नें सौख्यकारक. शुभ, अन्न आणि धन देणारीं होत.

गमनलग्नीं द्वादशस्थान परत्वें ग्रहबळ पाहाणें.

प्रथमस्थान ॥ जन्मस्थं चाष्टमंत्याज्यं लग्ने द्वादश मेव च ॥ ग्रहाणां च बलं वीक्ष्य गच्छेद्दिग्विजयन्नृपः ॥

टी॰ — लग्नीं आणि अष्टमस्थानीं द्वादश स्थानीं पापग्रह वर्ज करून ग्रहबळ घेऊन गमन करावें, दिग्विजय कार्य सिद्धि होय

स्थाने यदास्युर्गुरुसौम्यशुक्राः सिध्यंति कार्याणि च पंचमेन्हि ॥ राज्ञः पदं चास्करव देशलाभं मासस्य मध्येग्रह भावयुक्ते ॥

टी॰ — लग्नी गुरु अथवा बुध, शुक्र असले तर पांच दिवस अथवा येक मासांत राज्यपद, स्कस देश लाभ प्राप्त जाणावा

द्वितीयस्थानाचें फळ — जीवो बुधो वा भृगुनंदनो वा स्थाने द्वितीये गमनस्य काले ॥ स्कयस्व लाभं च तुरंगलाभं मासस्य मध्ये च चतुर्दशे न्हि ॥ २ ॥

टी०- द्वितीय स्थानीं गुरु,बुध अथवा शुक्र असले तर वस्त्र आणि तुरंग ला भ एके मासामध्यें चवदा दिवसांत प्राप्त होतात.

क्रूरा धनस्था रविराहुभौमाः सौरिश्च केतुस्त्रिभिरेव मासैः॥ वित्तस्य नाशं च ददाति मृत्युं सत्यं हि वाक्यं मुनयो वदंति॥४॥

टी०- द्वितीयस्थानीं रवि अथवा राहु,मंगळ,शनि,केतु, यांतून कोणताही क्रूर ग्रह असला तर तीन मासांत मृत्युकारक आणि वित्तनाशक हें सत्य वाक्य मुनी बोलतात.

तृतीयस्थानाचें फळ॥ स्थाने तृतीये गुरुभार्गवौ च सोमस्य सूनुश्च निशापतिश्च॥ करोति कार्यं सफलं च सर्वं पक्षद्वयेनापि दिनत्रयेण॥५॥

टी०- तृतीय स्थानीं गुरु,शुक्र,अथवा चंद्र,बुध,असलातर पक्षद्वय,अथवा तीन दिवसांत कार्य सफळ होईल.

चतुर्थस्थान॥ क्रूराश्चतुर्थे गमने यदा तु नस्युश्च शेषाः शुभदा हि कार्ये॥ तथापि दैवेन भवेच्च सिद्धिर्मासत्रयेणापि दशाहमध्ये॥६॥

टी०- क्रूरग्रह वर सांगितले आहेत त्यांतून कोणताही ग्रह चतुर्थ स्थानीं वर्जून शेष ग्रह राहिले ते असतां शुभ, परंतु दैवयोगें करून तीन मास दाहा दिवसांत कार्य सिद्धि होईल.

पंचमस्थान॥ गुरुर्भृगुश्चंद्रबुधौ यदा स्यात् शुभे च लग्ने तु सुते च युक्ताः॥ कुर्वंति कार्यस्य च सिद्धिमिष्टां मासद्वयेनापि वदंति सत्यं॥७॥ ॥७॥ ॥

टी०-गुरु,शुक्र,चंद्र,अथवा बुध या चोहों ग्रहांतून पंचमस्थानीं ग्रह असतां शुभ होय दोहों मासांनीं इष्टकार्य सिद्धि होईल.

षष्ठस्थान–जीवश्चशुक्रश्च बुधश्चषष्ठे करोति यात्रासफलांविलग्नात्॥पक्षद्वयेनापिवदंतिसम्यंसौम्यर्क्षमंस्थःसबलश्चचंद्रः॥८॥

टी०–गुरु,शुक्र,अथवा बुध, यांतून ग्रह षष्ठ स्थानी असला तर यात्रा सफळ आणि मृग नक्षत्रींचा चंद्र त्या स्थानीं असतां सबळ एकमासांनीं कार्य सिद्धि जाणावी.

सप्तमस्थान–चेत्सप्तमस्थागुरुसोमसौम्याः कुर्वंतियात्राविजयंनृपाणाम्॥सर्वेनृपास्तस्यभवंतिवश्यामासद्वयेनापिचपंचभिर्दिनैः॥९॥

टी०–सप्तम स्थानीं गुरु अथवा सोम,बुध असतां यात्रा विजयहोय,सर्व राजे वश्य दोनमास पांचादिवसांत होतील

अष्टमस्थान॥क्रूराश्चसर्वे यदिलग्नकाले मृत्युस्थितामृत्युकराभवंति॥सौम्योगुरुर्वाभृगुनंदनश्चदीर्घायुषंमृत्युकरश्चचंद्रः॥१०॥

टी०–क्रूर म्हणजे शनि,रवि,भौम,राहू,केतु,यांतून ८ स्थानीं ग्रह असतां मृत्युकारक आणि हे नसतां सौम्यग्रह असले तर आयुष्याची वृद्धि, परंतु चंद्र नसावा तो मृत्युकारक होय.

नवमस्थान–धर्मस्थितायदिभवंतिहिपापखेटाः प्रयाणकालेचतथैवचंद्रमाः॥तदाजयंवैसबलेचचंद्रेमासत्रयेणापिदिनैश्चतुर्भिः॥

टी०–नवम स्थानीं पापग्रह व चंद्र असतां उक्त,परंतु चंद्र बळ असावें म्ह० तीनमास चार दिवसांत कार्य सिद्धि होईल

धर्मस्थितोवायदिजीवशुक्रौसोमस्यसूनुर्यदिलग्नकाले॥लग्नेचरेवायदिवास्थिरेवाकार्यस्यसि

द्विश्च भवेच्च लाभः ॥

टी०-नवमस्थानीं गुरु,शुक्र अथवा सोम,बुध हे चर लग्न स्थित अथवा स्थिर लग्नीं असतां कार्य सिद्धि होय.

कर्मस्थान-कर्मस्थिता पापखगास्तु सौम्याः कुर्वंति कार्यं शनिवर्जिताश्च ॥ लग्ने चरे वाथ दिवा स्थिरे वा मासत्रयेणापि चन्वैकमासतः ॥

टी० दशमस्थानीं शनि आदिकरून पापग्रह वर्जून सौम्यग्रह असतां चर अथवा स्थिर लग्नीं उक्त तीनमासांनी अथवा एकमासानें कार्यसिद्धि होईल.

लाभस्थान-लाभस्थितो गुरुबुधौ भृगुनंदनो वाक्रूराश्च सर्वे शशिनैव युक्ताः ॥ सद्यः फलाप्तिश्च भवेद्वियात्रापक्षैकमध्ये दिवसत्रये च ॥

टी०-एकादशस्थानीं रविआदिकरून पापग्रह चंद्रसहित अथवा गुरु आदिकरून सौम्यग्रह असतां,पक्षामध्यें तीन दिवसांत कार्यसिद्धि होईल.

व्ययस्थान-सर्वे शुभा द्वादशसंस्थिताश्च यात्रा भवेत्तत्र विचित्रलाभः ॥ पापाश्च सर्वे व्ययदा भवंति यात्राफलं गर्गमुनि प्रणीतं

टी०-द्वादशस्थानीं सर्व ग्रह शुभ होत,विचित्र लाभ होय आणि पापग्रह व्ययस्थानीं असतां सफळ होत हें गर्गमुनी सांगतात.

प्रस्थान ठेवणें.

सुमुहूर्ते स्वयं गमनासंभवे प्रस्थानं कार्यम् ॥ श्लोक ॥ यज्ञोपवीतकं शस्त्रं मधुवस्थापयेत्फलम् ॥ विप्रादिक्रमतः सर्वं स्वर्णधान्यांबरादिकं ॥

एवमादीनिचान्यानित्थप्रशस्तानिदर्शने ॥

टी०– तूस भस्म. कपालास्थि निरनिराळी भाडी आणि तांब्यांचीं भांडी मृतसारग पक्षी हे गमन काळीं दुष्ट शकुन झालेतर गमन वर्जावें.

क्वयासितिष्ठआगच्छकिंतेतत्रगतस्यतु ॥ अन्य शब्दाश्चयेनिष्टास्तेविपत्तिकराअपि ॥

टी०– कोठून आला, कोठें जातां, उभे राहा, असे अन्यशब्द विपत्तिकारक होत

ध्वजादौवायसास्थानंक्रव्याद्दानंविगर्हितं ॥ स्खलनंवाहनानांचवस्त्रसंगस्तथैवच ॥

टी०–ध्वज,पताकावर काक बसलेला आणि अग्निदान, वाहन पतन,आणिवस्त्रनेसत नेसत असा पुरुष, ही अशुभ

दृष्टेनिमित्तेप्रथमेअमंगल्यविनाशनम् ॥ केशवं पूजयेद्विद्वान्स्तवेनमधुसूदनम् ॥

टी०– गमन समयीं वरसांगितलीं त्यांतून प्रथम अमंगल दृष्टीस आलें तर नाशकारक होय, याचे निवारणार्थ विष्णूची पूजा आणि मधुसूदनाचास्तव करावा

द्वितीयेचततोदृष्टेप्रतीपेप्रविशेद्गृहम् ॥ अथेष्टानिप्रवक्ष्यामिमंगलानितथानघ ॥

टी०–दुसऱ्या वेळेस कुशकुन दृष्टीस पडलेतर घरांत यावे. आतां इष्ट मंगळकारक शकुन सांगतों

## गमन काळीं उत्तमशकुन.

प्रशस्तोवाद्यशब्दश्चभिन्नभेरीरवास्तथा ॥ पुरतः शब्दएहीतिशस्यतेनतुपृष्ठतः ॥ गच्छेतिचैवपश्चाद्यः पुरस्ताद्धुविगर्हितः ॥

टी०— गमनकाळीं प्रशस्त शकुन वाद्यांचे शब्द— निरनिराळे, नगाऱ्याचे शब्द. येद्दाशब्द पुढें शुभ पृष्ठभागीं वाईट. जा ह्या शब्द पाठीमागें चांगला, पुढें वाईट.

श्वेताः सुमनसः श्रेष्ठाः पूर्णकुंभस्तथैवच ॥ जलजाः
पक्षिणश्चैवमांसंमत्स्यस्यपार्थिव ॥

टी०— पांढरींपुष्पें उत्तम. पूर्णकुंभ, जिवंतमासे, पक्षी, मत्स्याचें मांस, याप्रमाणें जाणावें.

गावस्तुरंगमोनागोवृषएकःपशुस्त्वजा ॥ त्रिदशाः
सुहृदोविप्राज्वलितश्चहुताशनः ॥

टी०— गाय, तुरंग, हत्ती, वृषभ एक पशु, शेळी, देव, सोयरे, ब्राह्मण, ज्वलित अग्नि.

गणिकाचमहाभागदूर्वाश्चार्द्रांश्चगोमयम् ॥ रु
क्मंरूप्यंचताम्रंचसर्वरत्नानिचाप्यथ ॥

टी०— फलवंतीण. ओल्यादुर्वा, शेण, सोनें, रुपें, तांबें, आणि सर्व रत्नें.

औषधानिच सर्वज्ञायचाःसर्वार्थकास्तथा ॥
खड्गपात्रंपताकाच मृत्तिकायुधपीठकम् ॥

टी०— औषधी, सूत्रपुरुष, खड्ग, यव, श्वेत मोहऱ्या, खड्गपात्र, पताका, मृत्तिका, आसन.

राजलिंगानिसर्वाणिशवंरुदितवर्जितम् ॥ घृतंद
धिपयश्चैवफलानिविविधानिच ॥

टी०— राजचिन्हें. प्रेत रडें वर्ज करून, तूप, दधि, दूध, नाना प्रकारचीं फळें.

स्वस्तिवृद्धिनिनादश्चनंद्यावर्तःसकौस्तुभः ॥

वादित्राणांशुभः शब्दोगंभीरःसुमनोहरः॥

टी०—आशीर्वाद शब्द, आणि शंख, कौस्तुभमणी, व वाद्यें, उत्तम चांगले मनरंजन करणारे शब्द विघ्ननाशकजाणावे.

गांधारषड्जऋषभायेगीताःसुस्वराःस्वराः॥वायुस शर्करोसुष्णः सर्वविघ्नविनाशकृत्॥

टी०—गांधार षड्ज. आणि ऋषभ. हे राग सुस्वर गात असतां, वायु चांगला मधुर अथवा उष्ण सर्व विघ्न नाशकारक होय.

प्रतिलोमस्तथानीचोविज्ञेयो भयकृद्द्विजः॥अनुकू लोमृदुःस्निग्धोसुखस्पर्शःसुखावहः

टी०—संकर जातीचा पुरुष तसाच नीच मुसलमानादि, ब्राह्मण मोठाभयंकर, आपणास अनुकूळ पदार्थ चांगले आणि सुख स्पर्शित मनुष्यादिक हे सुखावह होत.

शस्तान्येतानि धर्मज्ञयत्रस्यान्मनसः प्रियम्॥मन सस्तुष्टिरेयात्र परमंजयलक्षणम्॥

टी०—हे शकुन सांगितले ते प्रशस्त हे धर्मज्ञ यांत आपले मनास प्रिय असेल त्यांचे दर्शन फार उत्तम, तुष्टिकारक, जय देणारें होय.

मनोसुखत्वंमनसः प्रहर्षःशुभस्यलाभो विजयप्र वादः॥ मांगल्यलब्धिः श्रवणंचराज्ञां ज्ञेयानिनि त्यंविजयावहानि॥

टी०—मनाचा हर्ष जाण्याचे वेळेस शुभ लाभकारक, विजय वाद आणि मांगल्याची प्राप्ति व श्रवण या रीतीनें गमन नित्य केलें असतां विजय प्राप्त होतो

क्षेमंकरानीलकंठश्चोलूकखरजंबुकाः॥प्रस्था नेयामनःश्रेष्ठाप्रवेशेदक्षिणाःशुभाः॥७॥

टी०– मयुर. अश्व, उलुक पक्षी, गाढव, कोल्हा हे प्रस्थान समयीं वामभागीं घेऊन गमन करावें आणि प्रवेशाला दक्षिण भागीं घ्यावे शुभ होत.

अथ आनंदादि शुभाशुभ योगाः ॥

सूर्येश्विभात् हिनरोचिषिचंद्रधिष्ण्यात्सार्पाच्चभूमितनयेथबुधेचहस्तात् ॥ मैत्राद्गुरौभृगुसुतेखलुवैश्वदेवात्छायासुतेवरुणभात्क्रमशःस्युरेव ॥ आनंदकालदंडश्चधूम्राख्योथप्रजापतिः ॥ सौम्योध्वांक्षोध्वजोनामाश्रीवत्सोवज्रमुद्गरः ॥ छत्रंमैत्रोमानसश्चपद्माख्योलंबकस्तथा ॥ उत्पातोमृत्युकाणाख्यःसिद्धिश्चैवशुभोमृतः ॥ मुसलोथगदाख्यश्चमातंगोराक्षसश्चरः ॥ स्थिरःप्रवर्धमानश्चयोगोष्टाविंशतिःक्रमात् ॥ फलं ॥ आनंदेलभतेसिद्धिं कालदंडेमृतिं तथा ॥ धूम्राख्येनरकंचैवसौभाग्यंचप्रजापतौ ॥ सौम्येचैवमहत्सौख्यंध्वांक्षेच्चैवधनक्षयं ॥ ध्वजनाम्निचसौभाग्यंश्रीवत्सेसौख्यसंपदः ॥ वज्रेक्षयोमुद्गरेचश्रीनाशस्तुतथैवच ॥ छत्रेचराजसन्मानोमैत्रेपुष्टिर्नसंशयः ॥ मानसेचैवसौभाग्यंपद्माख्येचधनागमः ॥ लंबकेधनहानिश्चउत्पातेप्राणनाशनम् ॥ मृत्युयोगेभवेन्मृत्युःकाणेचक्लेशमादिशेत् ॥ सिद्धियोगेभवेत्सिद्धिःशुभेकल्याणमेवच ॥ अमृतेराजसन्मानोमुसलेचधनक्षयः ॥ गदाख्येचाक्षयाविद्यामातंगेकुलवर्धनं ॥ राक्षसेतुमहत्कष्टंचरेकार्यंचसिध्यति ॥ स्थिरयोगेगृहारंभोप्रवृद्धेपाणिपीडनम् ॥

| | योगांचीनावे | रवि | चंद्र | मंगळ | बुध | गुरु | शुक्र | शनि | फळे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | आनंद | अश्वि० | मृग | आश्ले | हस्त | अनु० | उ.षा | शतता | सिद्धि |
| २ | कालदंड | भरणी | आर्द्रा | म | चित्रा | ज्येष्टा | अ | पू० | मृत्यु |
| ३ | धूम्र | कृत्ति० | पु | पू | स्वा० | मू | श्र | उ | असुख |
| ४ | प्रजापति | रोहि० | पुष्य | उत्तरा | विशा | पू | धनि | रेव | सोभाग्य |
| ५ | सौम्य | मृग० | आश्ले | हस्त | अनुरा | उ.षा | शत० | अ० | मोटेसौख्य |
| ६ | ध्वांक्ष | आ० | म | चि | ज्ये० | अ | पू | भर | धनक्षय |
| ७ | ध्वज | पु० | पू | स्वाती | मू | श्रव० | उ.भा | कृति | सौभाग्य |
| ८ | श्रीवत्स | पु० | उत्त | विशा | पूर्वा | ध० | रे | रो० | सौख्यमं |
| ९ | वज्र | आ० | ह | अनु | उ.षा | शत | अ० | मृ | क्षय |
| १० | मुद्गर | मघा | चि | ज्ये० | अ | पू | भ | आ | लक्ष्मीना० |
| ११ | छत्र | पू० | स्वा | मू | श्रव | उ.भा | कृ | पु० | राजसन्मा |
| १२ | मैत्र | उत्तरा | विशा | पू | धनि | रेव | रो | पुष्य | पुष्टि |
| १३ | मानस | ह० | अ | उ | श | अश्वि | मृ | आ | सौभाग्य |
| १४ | पद्माख्य | चित्रा | ज्ये | अ० | पू | भ | आ | म० | धनप्राप्ति |
| १५ | लंबक | स्वा० | मूळ | श्रव | उ.भा | कृ | पु० | पू | धनहानि |
| १६ | उत्पात | वि०० | पू० | धनि | रेव | रो | पु | उ० | प्राणना |
| १७ | मृत्यु | अ० | उ | श० | अ | मृ | आ | हस्त | मृत्यु |
| १८ | काणाख्य | ज्ये० | अ | पू | भ | आ | मघा | चित्रा | क्लेश |
| १९ | सिद्धि | मू० | श्र | उ | कृति | पु | पू० | स्वाती | कार्यसि |
| २० | शुभ | पू० | ध | रे | रो० | पु० | उ | विशा | कल्याण |
| २१ | अमृत | उ.षा० | शत | अ० | मृ० | आ | ह० | अ० | राजम |
| २२ | मुसल | अ० | पू | भ | आ | म | चि | ज्ये | धनक्षय |
| २३ | गदाख्य | श्रव० | उ.भा | कृ० | पु | पू | स्वा | मू० | आक्षयवि० |
| २४ | मातंग | ध० | रेव० | रो | पु | उ० | चि | पू | कुलवृद्धि |
| २५ | राक्षस | श० | अ | मृ | आ | ह | अ | उ० | महाकष्ट |
| २६ | चर | पू० | भ | आ | म० | चि | ज्ये | अ | कार्यसि |
| २७ | स्थिर | उ० | कृ | पु | पू० | स्वा | मू | श्रव० | गृहारंभ |
| २८ | प्रवर्धमान | रेव० | रोहि | पुष्य | उ | वि | पू | ध० | लग्न |

टी०- आनंदादि योग अठ्ठावीस, त्यांत एकेक योगास सातवार व सात नक्ष त्रें त्यांचा क्रम, रविवारीं अश्विनी, सोमवारीं मृग, मंगळवारीं आश्लेषा, बुधवारीं हस्त, गुरुवारीं अनुराधा, शुक्रवारीं उत्तराषाढा, शनिवारीं शततारका, त्यावारीं अशीं नक्षत्रें आलीं ह्मणजे आनंदादिक योग होतात, अश्या अठ्ठावीस योगांचा क्रम मागें लिहिला आहे.

चरयोग- रवौ पूषा गुरौ पुष्यः शनौ मूलं भृगौ मघा॥ सौम्ये ब्राह्म्यं विशाभौमे चंद्रे द्रा चरयोगकः॥ क्रकचयोगः॥ रवौतु द्वादशी प्रोक्ता भौमे च दशमी तथा॥ चंद्रे चैकादशी प्रोक्ता नवमी बुधवासरे॥ शुक्रे च सप्तमी ज्ञेया शनौ चैव तु षष्ठिका॥ गुरौ चाष्टमिका ज्ञेयो योगस्तु क्रकचो बुधैः॥ दग्धयोग॥ बुध तृतीया कुज पंचमी च षष्ठ्यां गुरौ अष्टमी शुक्रवारे॥ एकादशी सोम शनिर्नवम्यां द्वादश्यमर्कामिति दग्धयोगः॥ मृत्युदा॥ रवौ भौमे भवे चंदा भद्रा जीवशशांकयोः॥ जया शुक्रे बुधे रिक्ता शनौ पूर्णा च मृत्युदा॥ सिद्धियोग॥ शुक्रे नंदा बुधे भद्रा जया भौमे प्रकीर्तिता॥ शनौ रिक्ता गुरौ पूर्णा सिद्धियोगा उदाहृताः॥ उत्पातादियोगः॥ विशाखादि चतुष्कं तु भास्करादिक्रमेण तु॥ उत्पातमृत्युकालाख्य सिद्धियोगाः प्रकीर्तिताः॥ यमदंष्ट्र योग॥ मघा धनिष्ठा सूर्ये तु चंद्रे मूल विशाखके॥ कृत्तिका भरणी भौमे सौम्ये पूषा पुनर्वसुः॥ गुरौ पूषाश्विनी शुक्रे रोहिणी चानुराधका॥ शनौ विष्णुः शतभिषक् यमदंष्ट्रः प्रकीर्तितः॥ यमघंट॥ रवौ मघा बुधे मूलं गुरौ चैव च कृत्तिका॥ भौमे चार्द्रा शनौ हस्तः शुक्रे चैव तु रोहिणी चंद्रे विशाखा योगोयं यमघंटः प्रकीर्तितः॥ मुसल वज्रयोगः॥ चंद्रे चित्रा भृगौ ज्येष्ठा शनौ चैव तु रेवती॥ चांद्रजे तु धनिष्ठोक्ता रवौ तु भरणी तथा॥ उषाश्चैव तु भौमे च गुरौ चैवोत्तरा तथा॥ अ

यंमुसलवज्राख्ययोगोवर्ज्यःशुभेबुधैः॥ अमृतसिद्धियोग आदित्यहस्तेगुरुपुष्ययोगेबुधानुराधाशनिरोहिणीच॥ सोमे चविष्णुर्भृगुरेवतीचभौमाश्विनीचामृतसिद्धियोगः॥ १४॥

टी०— चरयोगादि त्रयोदश योग आणि वार सात असे कोष्टकांत आहेत त्यांत ज्या वारीं नक्षत्र किंवा तिथि येईल तो योग त्या दिवशीं जाणावा.

| | योगांची नावे | रविवार | सोमवार | मंगळवार | बुधवार | गुरुवार | शुक्रवार | शनिवार |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | चरयोग | पूर्वाषाढा | आर्द्रा | विशाखा | रोहिणी | पुष्य | मघा | मूळ |
| २ | ककच योग | १२ तिथी | ११ तिथी | १० तिथी | ९ तिथी | ८ तिथी | ७ तिथी | ६ तिथी |
| ३ | दग्धयोग | १२ तिथी | ११ तिथी | ५ तिथी | ३ तिथी | ६ तिथी | ८ तिथी | ९ तिथी |
| ४ | मृत्युद | १ ६ ११ ति | २ ७ १२ ति | १ ६ ११ ति | ४ ९ १४ ति | २ ७ १२ ति | ३ ८ १२ ति | ५ १० १५ ति |
| ५ | सिद्धियो | ० ति | ० ति | ३ ८ १२ ति | २ ७ १२ ति | ५ १० १५ ति | १ ६ ११ ति | ४ ९ १४ ति |
| ६ | उत्पात | विशाखा | पूर्वा | धनिष्ठा | रेवती | रोहि | पुष्य | उत्तरा |
| ७ | मृत्युयो | अनुराधा | उत्तरा | शततार | अश्वि | मृग | आश्लेषा | हस्त |
| ८ | काळ० | ज्येष्ठा | अ० | पूर्वा | भरणी | आर्द्रा | मघा | चित्रा |
| ९ | सिद्धि | मूळ | श्रवण | उत्तरा | कृत्तिका | पुनर्वसू | पूर्वा | स्वाती |
| १० | यमदंष्ट्र | मघा धनि० | मूळ विशा० | कृत्तिका रोहिणी | पूर्वाषाढा पुनर्वसु | उत्तराषा अश्वि० | रोहिणी अनुराधा | श्रवण शततारका |
| ११ | यमघंट | मघा | विशाखा | मृग | मूळ | कृत्तिका | रोहिणी | हस्त |
| १२ | मुसल वज्र | भरणी | चित्रा | उ षा | धनिष्ठा | उत्तरा | ज्येष्ठा | रेवती |
| १३ | अमृत० | हस्त | श्रवण | अश्वि० | अनुरा० | पुष्य | रेवती | रोहिणी |

## दासवदासीठेवण्यासमुहूर्त.

दासचक्र॥नराकारंलिखेच्चक्रंसेवार्थभृत्यसंग्रहे ॥ शीर्षेत्रीण्यर्थलाभस्यान्मुखेत्रीणिविनाशनं॥हृदिपंच धनंधान्यंपादेषड्दरिद्रता॥पृष्ठेद्वेप्राण संदेहोनाभौवेदाः शुभावहम्॥गुदेद्वेभयपीडाचदक्षहस्तेकमर्थकम्॥एकंवा मेनाशकरंभृत्यभात्स्वामिभांतकं ॥३॥

टी०— नराकार चक्र काढून त्याचे मस्तका पासून अवयव स्थानीं नक्षत्रें द्यावया चीं त्याचा क्रम, दासाचे जन्म नक्षत्रा पासून स्वामीचें जन्म नक्षत्रा पावेतों प्र थम शीर्षावर ३ अर्थलाभ, मग मुखावर ३ नाश, पुढें हृदयावर ५ धनधा न्य समृद्धि, मग पायांवर ६ दरिद्र आणि पृष्ठावर २ मृत्यु, पुढें नाभीवर ४ शुभ, गुदावर २ भयपीडा, नंतर उजवे हातावर १ अर्थप्राप्ति नवेंस्था न, डाव्या हातावर १ नाश.

दासीचक्र॥ दासीचक्रंप्रवक्ष्यामिदासीभात्स्वामि भांतकं॥शीर्षेत्रीणि मुखेत्रीणि स्कंधयोश्चद्वयंस्मृतम्॥ हृदयेपंचऋक्षाणिनाभौपंचभगेकंकं॥जानुद्वयेद्वयंज्ञे यंपादयोश्चत्रयंत्रयं॥फलं॥शिरस्थानेभवेल्लाभो मुखेहानिःप्रजायते॥स्कंधेचस्वामिनोमृत्युर्हृदयेपुष्टि वर्धनं॥नाभौहानिर्भगेप्रोक्तंभगेचैवपलायनम्॥जा नौसेवालभे नित्यं पादयोस्तुधनक्षयः ॥४॥

टी०— दासीचे जन्म नक्षत्रा पासोन स्वामीचे जन्म नक्षत्रा पावेतों द्यावयाचीं स्थानें. प्रथम शीर्षावर ३ लाभ. पुढें मुखावर ३ हानि मग खांद्यावर २ स्वा मि मृत्यु, हृदयावर ५ पुष्टिहोय. नाभीवर ५ हानि. भगावर १ पळेल, दोंप रावर २ सेवाकरील. पायांवर ६ धनक्षय कारक यांतून शुभफळ आलें ल

रदासी ठेवावी

## गवादिपशुघेण्यासमुहूर्त.

गोवृषमहिषोचक्र॥शीर्षेत्रयंमुखेद्वेचपादेष
ट्टेविनिर्दिशेत्॥हृदयेपंचऋक्षाणिस्तनेषट्टेभगे
कर्क॥फळ॥शिरस्थानेभवेल्लाभोमुखेहानिःप्रजा
यते॥पादयोरर्थलाभःस्यात्हृदयेसौख्यवर्धनं॥स्त
नयोस्तुमहालाभोगुह्यस्थानेमहद्भयं॥अर्यमादिग
वांज्ञेयंमाहिष्यांसूर्यभान्न्यसेत्॥इदमेववृषेज्ञेयं
विशेषःपत्तुषोडश॥३॥

टी०– गाय अथवा वृषभ घेण्यास उत्तरा फल्गुनी पासोन दिवस नक्षत्रा पर्यंत यावयाची स्थानें प्रथम मस्तकावर ३ लाभदायक मग मुखावर २ हानि, पायांवर ६ अर्थलाभ, हृदयावर ५ सौख्य, स्तनावर ६ महा लाभ, भगावर १ प्रजावृद्धि, गुह्यावर ४ भय जाणावें आणि म्हशी घेण्यास हीच स्थानें व फळें परंतु सूर्य नक्षत्रा पासोन दिवसनक्षत्रा पावेतो क्रम जाणावा. आणि वृषभ घेण्यास स्थानें व नक्षत्रें यांचा क्रम गाईचा घ्यावा परंतु पायांचे स्थानीं सोळा नक्षत्रें यावीं शेष दोन दोन योजावीं, शुभफळ येईल तें घ्यावें.

अश्वघेण्यासमुहूर्त॥अश्वेतुसूर्यभाच्चैवसाभि
जिद्धानिविन्यसेत्॥पंचस्कंधेजन्मभांतपृष्ठेतुदश
कंन्यसेत्॥पुच्छेज्ञेयंद्वयंप्राज्ञेश्चतुष्पादेचतुष्टयम्॥
उदरेपंचधिष्ण्यानिमुखेद्वेचप्रकीर्तिते॥फळ॥सौ
भाग्यमर्थलाभश्चस्त्रीनाशोरणभंगता॥नाशश्च
अर्थलाभश्चफलंप्रोक्तंमनीषिभिः॥३॥

टी०–सूर्य नक्षत्रा पासून आपले जन्म नक्षत्रा पावेतों यावयाचा क्रमस्था

नें व फळें, प्रथम स्कंधावर ५ सौभाग्य, पुढें पृष्ठीवर १० अर्थलाभ, मग पुछावर २ स्त्रीनाश, पायांवर ४ रणभंगना, उदरावर ५ नाश, मग तोंडावर २ अर्थला भ. यांत शुभफळ येईल तें घ्यावें.

## गजघेण्यासमुहूर्त.

गजाकारंलिखेच्चक्रंजन्मभांतंच सूर्यभात्॥ कर्णे शीर्षेद्विजेपुछेद्वयंसर्वत्रयोजयेत्॥ शुंडायांतुद्वयंयोज्यंवेदाः पृष्ठोदरेमुखे॥ षड्ंचतुर्षुपादेषुसाभिजिद्दे न्यसेत्क्रमात्॥ फल॥ कर्णेचैवमहान्लाभोमस्तके लाभएवच॥ दंतेचैवभवेल्लाभोपुछेहानिःप्रजायते॥ शुंडायांतुशुभंज्ञेयंपृष्ठेतुसुखसंपदः॥ उदरेरोगसंभूतिर्मुखेतुमध्यमंस्मृतं॥ पादयोश्चभवेल्लाभोगजेचैवंविनिर्दिशेत्॥

टी०-पूर्वी सूर्यनक्षत्रापासून घावयाचा क्रम सांगितला आहे परंतु येथें स्थानें व फळें व नक्षत्रांची संख्या निराळी आहे ती, प्रथम कर्णावर २ लाभ, मग मस्तकावर २ लाभ, पुढें दांतांवर २ लाभ, पुछावर २ हानि, सोंडेवर २ शुभ, पृष्ठीवर ४ सुखसंपदा, पोटावर ४ रोग, तोंडावर ४ मध्यम, शेवटीं पायांवर ६ लाभ असें जाणावें.

## शिबिकादिरोहणचक्रमुहूर्त.

सूर्यभाद्दिनभंयावत्पंच पंचचतुर्दिशि॥ मध्येतुसप्तदेयानिचक्रंज्ञेयंसुखावहं॥ फलं॥ पूर्वभागेतुचारोग्यंदक्षिणेकष्टकारकं॥ पश्चिमेकृशतांचैवउत्तरे व्याधिसंभवः॥ मध्यस्थंचशुभंप्रोक्तमायुर्वृद्धिकरंपरं॥ पल्यंकारोपणंचैव बालकस्यबुधैर्हितम्॥ ६॥

टी०-सूर्यनक्षत्रा पासून दिवसनक्षत्रापावेतों पालखी अथवा पाळण्यां

नून आवर आरोहण करावयाचे असेल त्याचे चोहीं दिशेस व मध्यभागीं धावयाचा क्रम पूर्वभागीं ५ आरंभ, आणि दक्षिणेला ५ कष्टकारक प श्चिमेस ५ कुशना, उत्तरेस ५ व्याधिनाश, मध्ये ७ नक्षत्रें शुभकारक आ णि आयुष्याची वृद्धि यांतून शुभफळ येईल तो दिवस घ्यावा

## छत्रचक्र.

त्र्युत्तरारोहिणीरौद्रपुष्यश्चशततारका॥ धनिष्ठाश्र वणश्चैवशुभानिछत्रधारिणं॥ फलं॥ मूलेत्रीणिस प्तदंडे कंठेचैवतुपंचकं॥ मध्येवसुप्रदातव्यंशिखरे वेदएवच॥ मूलेचजायतेनाशोदंडेहानिर्धनक्षयः कंठेचराजसन्मानोमध्येछत्रपतिर्भवेत्॥ शिखरे कीर्तिवृद्धिश्चजन्मभा सूर्यभांतकं॥

टी०–उत्तरा तिन्ही, रोहिणी, आरद्रा, पुष्य, शततारका, धनिष्ठा, श्रवण, हीं नक्षत्रें शुभहोत, परंतु आपले जन्मनक्षत्रा पासून सूर्यनक्षत्रापावेतों धावयाचा क्रम, प्रथम मूळावर ३ जीवनाश, मगदांड्यांवर ७ हानि धनक्षय, पुढें क ठावर ५ राजसन्मान, मध्यें ८ छत्रपति, शेवटीं शिखरावर ४ कीर्तिवृ- द्धिहोय, यांतून शुभफळ येईल तो दिवस घ्यावा

## मंचकचक्र.

सूर्यभातृगणयेच्चांद्रं मंचमूलेचतुष्टयं॥ गात्रे षुरवेकं विंध्यास्मध्येसप्तविनिर्दिशेत्॥ फलं॥ मू लेतुसुखसौभाग्यंगात्रेप्रोक्तंभयंमहत्॥ मध्येस सुखलाभायआयुर्वृद्धिकरंपरम्॥

टी०–सूर्यनक्षत्रा पासोन दिवसनक्षत्रा पावेतों मंचक स्थानीं धावयाचा क्रम प्रथम खुरांवर १६, सुखप्राप्ति, मग गात्रांवर ४ भयप्राप्ति, पुढे विध्या वर १ भय, शेवटी मध्ये ७ सातपत्र लाभ आयुष्याची वृद्धि होय.

## सशर धनुश्चक्र.

सूर्यभाज्जन्मभांतंच धनुष्येवंचयोजयेत् ॥ चापमेवाण संख्याकं शराग्रे पंचयोजयेत् ॥ शरमूले तथापंच पंचसंधौप्रकीर्तयेत् ॥ दंडेचैवंतुदद्याद्वै धनुषश्चक्रमुत्तमं ॥ फलं ॥ अग्रेहानिः शरेलाभोशरमूलेजयस्तथा ॥ चापसंधौतुशौर्यंस्याद्दंडे भंगः प्रजायते ॥ ५

टी०—सूर्यनक्षत्रापासोन जन्मनक्षत्रापावेतों धनुष्यावर द्यावयाचींस्थानें व फळें सांगतों ॥ प्रथम अग्यावर ५ हानि, मग शराग्यावर ५ लाभ, शरमूलावर ५ जय, पुनः संधीवर ५ शौर्य, शेवटीं दंडावर ५ राज्यभंग; यांतून शुभफळ येईल त्यादिवशीं धारण करावें.

## रथचक्र.

रथाकारंलिखेच्चक्रंसूर्यभाज्जनिभंन्यसेत् ॥ रथाग्रेत्रीणिऋक्षाणिषट्‌चक्रेषुततान्यसेत् ॥ ऋक्षत्रयं मध्यदंडे रथाग्रे भत्रयंतथा ॥ युगेच भत्रयंज्ञेयं षडक्षाण्यंतिमेऽध्वनि ॥ शेषमृक्षत्रयंयोज्यंचक्रज्ञैः सर्वतोरथे ॥ फलं ॥ शृंगेमृत्युर्जयश्चक्रेसिद्धिर्ज्ञेयाच्चदंडके ॥ रथाग्रे दंडअध्वानंमध्येचैवस्फुरत्‌शुभं ॥ बुधैरेवंफलंज्ञेयंजन्मभांतंक्रमेणच ॥ गर्गेणोक्तानिचक्राणिविज्ञेयानिसदाबुधैः ॥

टी०—रथाकार चक्र काढून त्याच्यास्थानावर सूर्यनक्षत्रापासोन जन्मनक्षत्रापावेतों द्यावयाचाक्रम, प्रथम शृंगावर ३ मृत्यु, मग चाकांवर ६ जय, पुढें मध्यदांडीवर ३ सिद्धि, रथाग्यावर ३ धनलाभ, मगजोकडावर ३ भंग, शेवटीं मार्गावर ६ शुभ आणि सर्वत्र ३ सुख जाणावें.

## तिळांचाघाणालावण्यामुहूर्त.

घाणाचक्रंत्रयस्यामिसूर्यभाच्चांद्रमेवच॥त्रीणि
त्रीणित्रयंत्रीणित्रीणित्रीणित्रयंतथा॥त्रीणित्रीणि
तुभान्यत्रयोजयेत्घाणकेशुभे॥फलं॥हानिरैश्व
र्यमारोग्यंविनाशोद्रव्यमेवच॥स्वामिघातोनिर्धन
तामृत्युरेवसुखंक्रमात्॥

## उसांचारसकाढावयासमुहूर्त.

वेदद्विनेत्रभूभूतबाणहस्तरसाःक्रमात्॥फल॥
प्रथमंचलभेल्लक्ष्मींद्वितीयेहानिमेवच॥तृतीयेस
र्वलाभंचचतुर्थेचक्षयंतथा॥पंचमेचभयेन्मृत्युःषष्ठ
स्थानेशुभंस्मृतं॥सप्तमेचैवपीडास्यादष्टमेधनधा
न्यदं॥सूर्यभाद्गणयेच्चांद्रमिक्षुयंत्रेनियोजयेत्॥

टी०–सूर्यनक्षत्रा पासोन चंद्रनक्षत्रा पावेतो घाणाचक्रास भाग ९ आणि उ
सांचारस काढावयाचे चक्रास ८ यांचीं फळें खालीं लिहिलीं.

| घाणा | | | उसांचा | | |
|---|---|---|---|---|---|
| ६ | प्रथमभाग | हानि. | ४ | प्रथमभाग | लक्ष्मी. |
| ३ | भाग | ऐश्वर्य | २ | भाग | हानि |
| ३ | भाग | आरोग्य | २ | भाग | सर्वलाभ. |
| ३ | भाग | नाश | १ | भाग | क्षय. |
| ३ | भाग | द्रव्य | ५ | भाग | मृत्यु. |
| ३ | भाग | स्वामिघात. | ५ | भाग | शुभ. |
| ३ | भाग | निर्धन. | २ | भाग | पीडा |
| ३ | भाग | मृत्यु. | ६ | भाग | धनधान्य. |
| ३ | भाग | सुख | | | |

यांतशुभफळज्यादिवशीयेईल तो दिवस घ्यावा

## अथ कृषिकर्मासमुहूर्त.

स्वातीब्राह्ममृगोत्तरादितियुगेराधाचतुष्कंमघारे
वत्युत्तरविष्णुभंकृषिविधौक्षेत्रादिवापेविधौ॥गो
कन्याझषमन्मथाश्वशुभदावाराःकुजार्कीतरंषष्ठी
द्वादशिरिक्तपर्वसुतथावर्ज्यंद्वितीयाद्वयम्॥

टी०-स्वाती, रोहिणी, मृग, उत्तरा, पुनर्वसू, पुष्य, अनुराधा, ज्येष्ठा, मूळ, पूर्वाषाढा, मघा, उत्तरा फल्गुनी, श्रवण, हीं नक्षत्रें आणि वृषभ, कन्या, मकर, मिथुन, हीं लग्नें शुभ होत, मंगळ, शनिवार, व षष्ठी, द्वादशी आणि रिक्ता दोन्ही पर्वणी आणि द्वितीया द्वय, हीं वर्ज करून कृषिकर्मास आरंभ व बीजादिकांस हीं करावा.

## हलचक्र.

त्रिकंत्रिकंत्रिकंपंचत्रिकंपंचत्रिकंत्रिकम्॥सूर्य
भाद्वपनेत्र्यांद्रमशुभंचशुभंक्रमात्॥१॥

टी०-प्रथम नागरधरण्यासमुहूर्त, सूर्य नक्षत्रा पासून दिवस नक्षत्रा पावेतों गणून त्याचे भाग ८ त्यांचाक्रम, प्रथम ३ फळ अशुभ, द्वितीय भाग ३ शुभ. तृतीय ३ अशुभ, चतुर्थ ५ शुभ, पंचम ३ अशुभ, षष्ठ ५ शुभ, सप्तम ३ अशुभ. अष्टम भाग २ नक्षत्रें शुभ, या नक्षत्र भागामध्यें दिवस नक्षत्र शुभ येईल तो दिवस घ्यावा.

## गलबतांचा मुहूर्त.

पौष्णादितिस्तुरगवारुणशिवम्चित्रशीतोष्णरश्मि
वसुजीवकुभान्यमूनि॥वारेचजीवभृगुनंदनकेच
शस्तेनौकादिसंघटनवाहनमेषुकुर्यात्॥

टी०-रेवती, पुनर्वसु, अश्विनी, आश्लेषा, शततारका, अनुराधा, चित्रा, मृग, हस्त, धनिष्ठा, पुष्य, हीं नक्षत्रें आणि गुरु, भृगु, हे वार प्रशस्त यांजवर नवें गलबत्त

येनो यावयाची त्यांचाक्रमसांगतों मीन-कर्क-मकर, त्या तिहींत शीघ्र चंद्र अस तां पुष्कळ जळ लागेल. वृषभ कुंभ या राशीस चंद्र असतां तदर्धजळ लागेल वृश्चिक, तूळ, त्या राशीस चंद्र असतां अल्पजळ लागेल- शेष राशींस चंद्र अ- सता जळलागणार नाही




## वागांत लावण्याचा मुहूर्त-

गोसिंहालिगतेषुचोत्तरगतेभानौबुधादित्रयेचंद्रार्केच
शुभावुधैरभिहितारामप्रतिष्ठाक्रिया॥

टी०-उदगयनी वृषभ अथवा सिंह वृश्चिक या राशींचा सूर्य आणि बुध गुरु शुक्र चंद्र रवि हेवार, अशा शुभदिनीं नूतनलागवड करावी

आश्लेषाभरणीद्वयंशततभिषक्स्वाविशाखांकुहूंरि
क्तापक्षतिमष्टमींपरिहरेत्षष्ठीमपिद्वादशीं॥

टी०-आश्लेषा-भरणी कृत्तिका-शततारका विशाखा आणिअमावास्या रिक्तातिथि द्वितीयाअष्टमी-षष्ठी द्वादशी इतकीं वर्जकरून अन्यदिनीं लागवड शुभ होय

## शिक्षाचालवण्यासमुहूर्त.

मृदुध्रुवक्षिप्रचरेषुभेषुयोगेप्रशस्तेशनिचंद्रवर्ज्ये॥ वारेतथापूर्णजलाख्ययेन्मुद्राप्रशस्ताशुभदाहिराज्ञा॥

टी०–मृदु, ध्रुव, क्षिप्र, चर, हीं नक्षत्रें प्रशस्त आणि शनिवार चंद्रवार हे वर्ज.

---

## अथप्रश्नप्रकरण.

### तिथ्यादिप्रयुक्तप्रश्न.

तिथिःप्रहरसंयुक्तातारकावारमिश्रिता॥ अग्निभिस्कहरेद्भागंशेषंसत्वंरजस्तमः॥ १॥ फलम्॥ सिद्धिस्तात्कालिकेसत्वेरजसातुविलंबिता॥ तमसानिष्फलंकार्यंज्ञातव्यंप्रश्नकोविदैः॥ २॥

टी०–प्रश्नज्या तिथिवारीं नक्षत्रीं आणि प्रहरीं करील त्याचें उत्तर खालीं लिहिल्या उदाहरणा प्रमाणें घ्यावें. उदाहरण.– तिथ.५ व वार२ नक्षत्रें७ प्रहर२ मिळवणी १७ भाग ३ भोग्य १५ शेष २ त्याचें नांव दुसरें रज त्याचें फळ कार्य विलंब, याप्रमाणें ३ उरलें तर तम निःफळ, शेष एक उरेल तर सत्व त्याचें फळ सिद्धि.

### आत्मछायाप्रयुक्तप्रश्न.

आत्मछायात्रिगुणितात्रयोदशसमन्विता॥ वसुभिःप्रहरेद्भागंशेषंचैवशुभाशुभम्॥ १॥ फलं॥ लाभश्चैकेद्विकेसिद्धिर्वृद्धिःपंचसप्तके॥ द्वयोर्हानिश्चतुःशोकंषष्ठाष्टेमरणंध्रुवम्॥ २॥

टी०–आपुली छाया मोजून त्रिगुणित करून आंत तेरा मिळवून आठांनीं भागावें शेष उरेल तें फळ जाणावें.

| शेष १ | शेष २ | शेष ३ | शेष ४ | शेष ५ | शेष ६ | शेष ७ | शेष ८ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| लाभ | हानि | सिद्धि | शोक | वृद्धि | मरण | वृद्धि | मरण. |

## अथपंथाप्रश्न.

तिथिप्रहरसंयुक्ता तारकावारमिश्रिता ॥ सप्तभिस्तु हरेद्भागं शेषंतु फलमादिशेत् ॥ १ ॥ वर्तमानंच नक्षत्रं गणयेत्कृत्तिकादितः ॥ सप्तभिश्च हरेद्भागं शेषं प्रश्नस्य लक्षणं ॥ २ ॥ प्रश्नाक्षरं रुद्रयुक्तं सप्तभिर्भाजितं तथा ॥ फलमेवं क्रमाज्ज्ञेयं सर्वेषां हि शुभाशुभम् ॥ ३ ॥

टी०–तिथि, प्रहर, आणि वार व नक्षत्र एकत्र मिळवून सातांनीं भागावें शेष उरेल तें फळ. दुसरा प्रकार दिन नक्षत्रापासून कृत्तिका पावेतों गणना करून सातानीं भागावें. तिसरा प्रकार–प्रश्नाची अक्षरें मोजून त्यांत अकरा मिळवावे आणि सातांनी भागावे. शेषउरेल तें फळ.

## फळें.

एकेशेषे तथा स्थाने द्वितीये पथि वर्तते ॥ तृतीयेप्यर्धमार्गेतु चतुर्थे ग्राममादिशेत् ॥ १ ॥ पंचमे पुनरावृत्तिः षष्ठे व्याधियुतं वदेत् ॥ शून्यं ज्ञेयं सप्तमेवै चैतत्प्रश्नस्य लक्षणम् ॥ २ ॥

टी०–शेष १ स्थानींच आहे. २ मार्गचालत आहे. ३ अर्धमार्गी आला ४ गांवाजवळ आला ५ माघारा गेला ६ व्याधिग्रस्त आहे. ७ मृत्यु. ही तीन पंथा प्रश्नाची फळे क्रमे करून जाणावीं

## दुसराप्रकार.

धनसहजगतौ सित्तामरेज्यौ कथयतरागमनं प्रवासिपुंसां ॥ तनुहिबुकगतावि भौच तद्वत्झटिति नृणां कुरुतो गृहप्रवेशम् ॥ १ ॥

टी०–द्वितीय स्थानीं शुक्र. तृतीयस्थानीं गुरु. अथवा पृच्छा लग्नीं शुक्र. चतुर्थस्थानीं गुरु असा योग असता प्रवासी गृहास लवकर येईल

## अथकार्याकार्यप्रश्न.

दिशाप्रहरसंयुक्तानक्षत्रवारमिश्रिता ॥ अष्टभिस्तु ह
रेद्भागं शेषं प्रश्नस्य लक्षणम् ॥ १ ॥ फल ॥ पंचैके त्वरिता
सिद्धिः षट्चतुर्थे च दिनत्रयं ॥ त्रिसप्तके विलंबश्च द्वौ ना
शे न च सिद्धिदौ ॥ २ ॥

टी०— पृच्छकाचें मुख ज्या दिशेस असेल ती दिशा व प्रहर, वार, नक्षत्र, अशीं सर्व एकत्र करून आठांनीं भागावें शेष उरेल त्याचें शुभाशुभ फळ जाणावें. शेष १ अथवा ५ उरले तर त्वरित कार्य सिद्धि. ६, ४, उरलें तर तीन दिवसां त कार्य सिद्धि. ३, ७, विलंबें करून कार्य सिद्धि. २, ८, कार्य होणार नाहीं.

## अंकप्रश्न.

अंकं द्विगुणितं कृत्वा फलनामाक्षरैर्युतं ॥ त्रयोदश
युतं कृत्वा नवभिर्भागमाहरेत् ॥ १ ॥ फलं ॥ एके हि ध
नवृद्धिश्च द्वितीयेन धनक्षयः ॥ तृतीये क्षेममारोग्यं
चतुर्थे व्याधिरेव हि ॥ २ ॥ पंचमे च स्त्रिलाभः स्यात्षष्ठे
बंधुविनाशनं ॥ सप्तमे ईप्सिता सिद्धिरष्टमे मरणं ध्रु
वम् ॥ ३ ॥ नवमे राज्यसंप्राप्तिर्गर्गस्य वचनं तथा ॥

टी०— नऊ अंकांतून एका अंकाचें नांव ध्यावयास सांगावें. जा अंकाचें नांव घेईल त्याचें द्विगुणित करून मग फळाचें नांव घ्यावें त्याचीं अक्षरें व दुसरे तेरा अंक त्यांत मिळवावे. आणि द्विगुणित केलेले ते असे सर्व एकत्र करून नवांनीं भागावें. शेष राहील त्याचें फळ शुभाशुभ. शेष १ धनलाभ. २ धनक्षय ३ आरोग्य. ४ व्याधि ५ स्त्रीलाभ. ६ बंधूचा नाश. ७ कार्यसिद्धि. ८ मरण, ९ राज्यप्राप्ति, असें गर्गमुनी सांगतात.

नवग्रहात्मकं यंत्रं कृत्वा प्रश्नं निरीक्षयेत् ॥ फलं
पूर्वोक्तमेवात्र द्रष्टव्यं प्रश्नकोविदैः ॥

| ४ | ३ | ८ |
|---|---|---|
| ९ | ५ | १ |
| २ | ७ | ६ |

टी०-नवग्रहात्मक यंत्र करून त्यांतील अंकाचें अवलोकन किं-वा अंकावर हात ठेऊन किंवा उच्चार करवून अंक येईल त्याची फळें पूर्वी सांगितलीं आहेत तीं पाहून यथाक्रमे सांगावीं.

अन्यमतें ॥ सप्तत्रयांके कथयंति वार्तां नवैकपंचत्वरितं वदंति ॥ अष्टौ द्वितीयेन हि कार्यसिद्धीरसाश्चवेदा घटिकात्रयं च ॥ १ ॥

टी०-अन्यमतें. पूर्वींचे अंक सांगितले आहेत त्याप्रमाणें करून परंतु फळें निराळीं. शेष ७ अथवा ३ उरले तर वार्ता ऐकण्यांत येईल ९, १, ५, त्वरित कार्य होईल. ८, २, कार्य होणार नाहीं ४, ६, तीन घटकानीं कार्य होईल असें समजावें.

## वारनक्षत्रप्रयुक्तपंथाप्रश्न.

बुधे चंद्रे तथा मार्गे समीपे गुरुशुक्रयोः ॥ रवौ भौमे तथा दूरे शनौ च परिपीड्यते ॥ १ ॥ निर्जीवः सप्तऋक्षाणि सजीवो द्वादशे भवेत् ॥ व्याधितो नवऋक्षाणि सूर्यधिष्ण्याच्च चांद्रभम् ॥ २ ॥

टीका- बुधवारीं व सोमवारीं प्रश्न केला तर मार्ग चालता आहे, गुरुवारीं शुक्रवारीं समीप आला, रविवारीं भौमवारीं दूर आहे शनिवारीं अनिष्ट होय सूर्यनक्षत्रापासून चंद्रनक्षत्रापावेतो घ्यावयाचा क्रम. प्रथम सात नक्षत्रांत चंद्र आला तर निर्जीव द्वितीय बारा नक्षत्रांत चंद्र आला तर जिवंत आहे तृतीय नऊ नक्षत्रांत चंद्र आला तर व्याधि उत्पन्न झाला आहे असा पंथाप्रश्न जाणावा.

## नष्टवस्तुप्रश्न

तिथिवारं च नक्षत्रं लग्नं वन्हि विमिश्रितं ॥ पंचभिस्तु हरेद्भागं शेषं तत्वं विनिर्दिशेत् ॥ फलं ॥ पृथि

ध्यांतु स्थिरं ज्ञेयं अप्सुव्योम्निनलभ्यते ॥ तेजस्तुराजगं ज्ञेयंवायोशोके विनिर्दिशेत् ॥

टी०-प्रश्न तिथि, वार, नक्षत्रें, लग्न, व तीन एकत्र करून, पाचांनीं भागावें. शेष १ उरलातर पृथ्वींतआहे. २ उरलेतरजलांत आहे, सांपडणारनाहीं; ३ उरले तर आकाशांत आहे मिळणारनाहीं. ४ उरले असतां तेज, राजाने वस्तु नेली. ५ उरलेतर वायु: शोक, असें जाणावें.

## गर्भिणी प्रश्न.

तत्पृच्छलग्नेरविजीवभौमे तृतीयसप्तेनवपंचमेचा ॥ गर्भःपुमान्वैऋषिभिःप्रणीतंचान्यग्रहेस्त्रीविबुधैः प्रणीतम् ॥ १ ॥

टी०- गर्भिणीज्या लग्नावर प्रश्न करील त्या लग्नीं ग्रह पाहाणें. लग्नाचे तृतीय अथवा सप्तम नवम, पंचम, स्थानीं. रवि, गुरु, भौम असले तर पुत्रहोईल किंवा या स्थानीं अन्य ग्रह असले तर कन्या होईल.

## मुष्टिप्रश्न.

मेषेरक्तं वृषे पीतं मिथुने नीलवर्णकम् ॥ कर्केचपांडुरंज्ञेयं सिंहे धूम्रंप्रकीर्तितं ॥ १ ॥ कन्यायांनीलमिश्रं तुलायांपीतमिश्रितम् ॥ वृश्चिके ताम्रमिश्रंचचापे पीतंविनिश्चितं ॥ २ ॥ नक्रेकुंभे कृष्णवर्णं मीनेपीतं चदेत्सुधीः ॥

टी०-पृच्छकाचे मुष्टींत कोणते वर्णाची वस्तु आहे ती सांगावी, ती याप्रमाणें, मेषलग्नअसलें तर तांबडे वर्णाची वस्तु मुष्टींत आहे आणि वृषभलग्नअसलें तरपिवळी. मिथुनीं निळी. कर्कीं पांढरी सिंहीं धुम्रवर्णाची. कन्यालग्नीं नीलमिश्रित. तूळीं पीतमिश्रित. वृश्चिकीं ताम्रमिश्रित. धनीं पीतमिश्रित. मकरीं कृष्णवर्ण. कुंभीं लोहमय. मीनीं पीतवर्णाची वस्तु आहे असें सांगावें.

## लग्नपरत्वें मनचिंतितप्रश्न

मेषेचद्विपदांचिंतावृषेचिंताचतुष्पदः॥मिथुनेगर्भचिंतान्व्यवसायस्यकर्कटे॥सिंहेचजीवचिंतास्यात्कन्यायांचस्त्रियस्तथा॥तूलेचधनचिंताचव्याधिचिंताचवृश्चिके॥चापेचधनचिंतास्यान्मकरेशत्रुचिंतनं॥कुंभेस्थानस्यचिंतास्यान्मीनेचिंताचदैविकी॥

टी०- लग्नपरत्वें प्रश्नाचेउत्तर मेषलग्नी प्रश्न केलातर मनुष्याची चिंता, वृषभ लग्नी गाईम्हशी इत्यादिचतुष्पदांची, मिथुनी गर्भाची, कर्की व्यापाराची, सिंहीजीवाची कन्यालग्नीं स्त्रीची, तूली धनाची, वृश्चिकी रोगाची, धनीं धनाची, मकरीं शत्रूची, कुंभी स्थानाची, मीनलग्नीं भूतपिशाचादिकदैविक अशाचिंता लग्नपरत्वें पृच्छकास सांगाव्या

## संज्ञापरत्वेंलग्नाचीनावें.

धातुर्मूलंजीवश्चरस्थिरद्विस्वभावाश्च॥मेषादयःक्रमेणज्ञातव्याःप्रश्नकोविदैः॥

टी०- मेषादिक्रमाने द्वादश लग्नें, त्यांचीनावें दोनदोन संज्ञेची सांगतो, धातुचर अशी मेष लग्नाची संज्ञा, मूल स्थिर, वृषभाची, जीव द्विस्वभाव, मिथुनाची, धातुचर कर्काची, मूलस्थिर सिंहाची, जीवद्वि स्वभाव कन्येची, धातुचर तूळेची, मूलस्थिर वृश्चिकाची. जीवद्वि- स्वभाव, धनाची, धातुचर, मकराची, मूलस्थिर कुंभाची, जीव द्वि- स्वभाव ही मीनाची संज्ञा अशा द्वादश लग्नांच्या संज्ञा जाणाव्या

## अंकप्रश्न.

अष्टोत्तरशतेचैवप्रश्निकोन्यूनमाचरेत्॥शेषंद्वादशभिर्भक्तंशेषंचैवशुभाशुभम्॥१॥ फलं॥ एकंदुर्गासप्तकेचैविलंवश्चागेतुर्येदिक्षुभूतेषुनाशः॥रुद्रेसिद्धिर्मंगुलेरद्विरुक्ताशीघ्रंकार्यस्याग्निषट्द्वादशेषु॥२॥

टी०-प्रश्न पृच्छका कडून अष्टोत्तरशताचे अंकांतून एके अंकाचें नाव घेवावें आणि त्यास बारांनीं भागावें शेष उरेल त्याचीं फळें. शेष १अथवा ९, किंवा ७उरले तर विलंबें कार्य होईल. शेष ८, ४, १०, ५, उरलेतर नाश. ११, सिद्धि. ३ वृद्धि. २, ६, १२, उरले तर शीघ्र कार्य सिद्धि होईल असें जाणावें.

## रोगीप्रश्न.

तिथिवारंचनक्षत्रंलग्नंप्रहरएवच ॥ अष्टभिस्तुहरेद्भागंशेषंतुफलमादिशेत् ॥ फलं ॥ त्र्याग्नौदेवताबाधापैत्रीवेनेत्रदंतिषु ॥ षट्चतुर्षुभूतबाधानबाधाएकपंचके ॥ २ ॥

टी०- तिथि वार नक्षत्र लग्न आणि प्रहर हीं प्रश्न दिवशीं एकत्र करून आठांनीं भागावें शेषउरेल त्याचें फळ. शेष ७ अथवा तीन उरले तर देवतेची बाधा. २, ८, पितरांची बाधा; ६, ४, भूत बाधा, १. ५, उरलेतर बाधा नाहीं.

## केवळ लग्न परत्वें.

मेषेचदेवीदोषःस्यात् वृषेदोषश्चपैत्रिकः ॥ मिथुनेशाकिनीदोषः कर्कटंभूतदोषकः ॥ सिंहेसहोदराणांवेकन्यायांकुलमातृजः ॥ तूलेदोषश्चंडिकायानाडीदोषोहि वृश्चिके ॥ चापेचयक्षिणीपीडामकरेग्रामदेवतात् ॥ अपुत्रादृष्टिजःकुंभेमीनेआकाशगामिनः ॥ ४ ॥

टी०-जा लग्नीं रोगी प्रश्न करील त्याचें उत्तर, मेष लग्नीं देवी दोष, वृषभीं पितृदोष, मिथुनीं शाकिनी दोष, कर्की भूतदोष, सिंहीं भावाचा दोष. कन्या, कुळदेवतेचा दोष, तूळीं चंडिका दोष, वृश्चिकीं नाडी दोष, धनीं यक्षिणी दोष, मकरीं ग्रामदेवतेचा, कुंभीं अपुत्र स्त्री दर्शनीय दोष, मीनीं आकाश गामिनीय दोष, असे पृच्छक लग्न परत्वें रोग सांगावे.

## पर्जन्यप्रश्न.

आषाढस्यासितेपक्षेदशम्यादिदिनत्रये ॥ रोहिणी

कालमाख्यातिसुमदुर्भिक्षलक्षणं ॥ १ ॥ रात्रावेवनिर्भ्रंस्याप्रभातेमेघडंबरं ॥ मध्यान्हेजलबिंदुःस्यात्तदादुर्भिक्षकारणम् ॥ २ ॥

टी०-आषाढ कृष्णपक्षांची दशमी किंवा एकादशी. द्वादशी. त्या तिन्हीं दिवसांत रोहिणी दिवस नक्षत्र आलेतर सुभिक्ष मध्यम, दुर्भिक्ष हीं तिन्हीं फळें तिथी क्रमेकरून घ्यावीं आणि रात्रीं निरभ्र, प्रातःकाळीं मेघ गर्जना. मध्यान्हीं जल बिंदु पडतात असे लक्षण झाल्यावर त्या संवत्सरीं महर्गता होईल असें जाणावें.

## जललग्नें

कुंभःकर्कवृषोमीनमकरोवृश्चिकस्तुला ॥ जललग्नानिचोक्तानिलग्नेघेतेषुसूर्यभं ॥ १ ॥ लभसेवरसदावृष्टिर्ज्ञातव्यागणकोत्तमैः ॥

टी०-कुंभ. कर्क, वृषभ, मीन, मकर, वृश्चिक, तूळ, हीं ७ जल लग्नें होत ॥ यांवर सूर्य महा नक्षत्र निघालें तर पर्जन्य पुष्कळ पडेल.

पर्जन्यनक्षत्रें ॥ अश्विनीमृगपुष्येषुपूषविष्णुमघासुच ॥ स्वात्यांप्रविशतेभानुर्वर्षतेनात्रसंशयः ॥

टी०- अश्विनी, मृग, पुष्य, रेवती, श्रवण, मघा, स्वाती, त्या दिवस नक्षत्रीं सूर्यानें महानक्षत्रीं प्रवेश केला असतां पर्जन्य वृष्टि पुष्कळ होईल.

## स्त्रीनपुंसकपुरुषनक्षत्रें.

आर्द्रादिदशकंस्त्रीणांविशाखाचिनपुंसके ॥ मूलाच्चतुर्दशपुंसांनक्षत्राणिक्रमाद्बुधैः ॥ वायुर्नपुंसकेभेचस्त्रीणांभेचाभ्रदर्शनं ॥ स्त्रीणांपुरुषसंयोगेवृष्टिर्भवतिनिश्चितं ॥ २ ॥

टी०- आर्द्रादि त्यापासून १० नक्षत्रें स्त्रीसंज्ञक होत, विशाखादि ज्येष्ठांत हीं ३

नपुंसक, मूळादि मृगांनहीं १४ नक्षत्रें पुरुष संज्ञक होत ॥ नपुंसक नक्षत्रीं स्त्री महानक्षत्र आलें तर वायुसुटेल ॥ आणि दोन्हीं स्त्री नक्षत्रें आलींतर अभ्रये ईल। स्त्री पुरुष असा योग आलातर पर्जन्य वृष्टि होईल.

## सूर्यवचंद्रनक्षत्रसंज्ञा ॥

अश्विन्यादित्रयंचैवआर्द्रादेःपंचकंतथा ॥ पूर्वाषा
ढादिचत्वारिचोत्तरारेवतीद्वयं ॥ उक्तानिशशिभान्यत्र
प्रोच्यंतेसूर्यभान्यथ ॥ १ ॥ रोहिणीचमृगश्चैवपूर्वाफल्गु
निकातथा ॥ सूर्येसूर्ये भवेद्वायुश्चंद्रेचंद्रेनवर्षति
॥ २ ॥ चांद्रसूर्योभवेद्योगस्तदावर्षतिमेघराट् ॥

टी०- अश्विनी, भरणी, कृत्तिका, आरद्रा, पुनर्वसू, पुष्य, आश्लेषा, मघा, पूर्वाषाढा, उत्तराषाढा, श्रवण, धनिष्ठा, उत्तरा, रेवती, हीं चंद्रनक्षत्रें ॥ आणि शेष जीं उरलीं तीं सूर्यनक्षत्रें जाणावीं.

फळें ॥ दिवस नक्षत्र आणि महानक्षत्र हीं दोन्हीं सूर्य असलीं तर वायु सुटेल ॥ आणि दोन्हीं चंद्र नक्षत्रें आलीं तर पर्जन्य पडणार नाहीं ॥ जेव्हां चंद्र आणि सूर्य अशीं येतील तेव्हां वृष्टि होते असें जाणावें.

---

## धान्यप्रश्न.

कापायेजयशर्मलाभकुगिरोमित्राणिसर्वंशुभं ॥ गो
रायेप्रियभुग्धनानिलपरेलाभारिनाशादिकं ॥ रख्यां
गेकलहःश्रियश्चबलगेस्थानानिमित्रागमो ॥ रोरारां
विपदापरांगकलहः स्यालेयशोकावहः ॥ १ ॥

टी०- सत्तावीस दाणे धान्याचे घेऊन एक रास करावी मग त्या राशींतून येक चिमटी भरून निराळे ठेवावे ह्मणजे तीन राशी होतात त्यांतील दाणे मोजून शेवटीं एकेक उरला तर शुभ असें विचार पाहवें उदाहरण ॥

प्रदातव्यंवामहस्तेत्रयंतथा॥ कुक्ष्योषट्कंन्चदातव्यं पादैकैकं विनिर्दिशेत्॥२॥ फलं॥ मुखेचद्रव्यहरणं शीर्षेलाभकरंस्मृतं॥ हानिर्ददक्षिणेहस्तेहृदयेचसुखावहं॥३॥ वामहस्तेतुरोगाश्चकुक्ष्योः शोकस्तथैवच॥ पादयोर्हानिरोगौन्चजन्मधिष्ण्यादिचंद्रभं॥४॥

भौम॥ भौमन्चक्रंप्रवक्ष्यामिजन्मधिष्ण्यादिभौमभं॥ शीर्षेषट्कंमुखेत्रीणित्रीणिवेदक्षिणेकरे॥ पादयोःषट्प्रदातव्यंवामहस्तेत्रयंतथा॥ गुह्येचैकंनेत्रयोर्द्वेहृदयेत्रयमेवच॥२॥ फलं॥ विजयश्चैवरोगश्चलक्ष्मीःपंथाभयंतथा॥ मृत्युर्लाभःसुखंचापिफलंज्ञेयंविचक्षणैः॥३॥

| सूर्य — सूर्यसक्रांतज्यानक्षत्रीअसेलतेथून जन्मनक्षत्रापर्यंत मोजूनजेथें नक्षत्र पडेल ते फळजाणावें | | | चंद्र — जन्मनक्षत्रापासूनज्यानक्षत्री चंद्र असेल तेथपर्यंत मोजावेजे थे नक्षत्र पडेल त फळ जाणावे | | | मंगळ — जन्मनक्षत्रापासून भोमज्या नक्षत्री असेल तेथ पर्यंतमोजून जेथेनक्षत्रपडेलते फळजाणावें | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| स्थानें | नक्षत्रे | फळें | स्थानें | नक्षत्रे | फळें | स्थानें | नक्षत्रे | फळें |
| मुखावर | ३ | रोगप्राप्ति | मस्तकावर | ६ | लाभ | शिरावर | ६ | विजय |
| उ हात | ४ | लाभ | मुखावर | १ | द्रव्यहरण | मुखावर | ३ | रोगप्रा |
| पांयावर | ६ | मार्गचाल | उ हातावर | २ | हानि करील | उ हाता | ३ | लक्ष्मीप्रा |
| डा बाहु | ४ | बधन | हृदयावर | ६ | सुखप्राप्ति | पायांवर | ६ | मार्गचाल |
| हृदयावर | ५ | लाभ | डावा हा | २ | रोगप्राप्ति | डा हाता- | ३ | भय |
| नेत्रांवर | ४ | लक्ष्मीप्रा | कुक्षी | ६ | शोक | गुदावर | १ | मृत्यु |
| मस्तकावर | १ | राजगृहिपू- | उ पाय | १ | हानि | नेत्रावर | २ | मृत्यु |
| गुदावर | १ | अपमृत्यु | डा पाय | १ | रोगप्राप्ति | हृदयावर | ३ | सुख |

बुध॥ बुधचक्रंप्रवक्ष्यामिजन्मऋक्षादिसौम्यभं॥

शिरसि त्रीणि राज्यं स्यात्सुखे एकं धनधान्यदं ॥ १ ॥ नेत्रे
द्वे प्रीतिलाभौ च नाभौ पंचकं तथा ॥ पादयोः षट् प्रवास
श्च वामे चेद्धा धनं तथा ॥ २ ॥ चत्वारि दक्षिणहस्ते धनलाभस्त
थैव च ॥ गुह्यस्थाने भद्वयं च बंधनं मरणं फलं ॥ ३ ॥

गुरु ॥ ॥ गुरुचक्रं प्रवक्ष्यामि गुरुभाज्जन्मभं स्मृतं ॥ दद्याच्छि
रसि चत्वारि चत्वारि दक्षिणे करे ॥ १ ॥ एकं कंठे मुखे पंच
पादयोः षट्प्रदापयेत् ॥ करे वामे च चत्वारि त्रीणि दद्याच्च
नेत्रयोः ॥ २ ॥ फलं ॥ राज्यं लक्ष्मीर्धनं लाभः पीडा मृत्युः सुखं तथैव
च ॥ सुखं नैव क्रमेणैव फलं ज्ञेयं धिषणोः ॥ ३ ॥

शुक्र ॥ ॥ शुक्रचक्रं प्रवक्ष्यामि शुक्रधिष्ण्याज्जन्मभं ॥ मुखे
त्रीणि महालाभः शीर्षे पंच शुभावहः ॥ १ ॥ त्रिकं तु दक्षिणे
पादे क्लेशहानिकरं सदा ॥ तथैव वामपादे च त्रीणि भानि नियो
जयेत् ॥ २ ॥ हृदये द्वे धनं सौख्यं नाभिकं हस्तयोर्द्वयोः ॥ मित्र
सौख्यं धनप्राप्तिर्गुह्ये त्रीणि तथैव च ॥ ३ ॥ स्त्रीलाभश्च फ
लं प्रोक्तं भृगुपुत्रस्य सूरिभिः ॥

| बुध | | | गुरु. | | | शुक्र. | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| जन्मनक्षत्रापासून तों बुधज्या नक्षत्रीं असेल तेथपर्यंत मोजून ज्या स्थानीं पडेल त्या स्थानाचें फल जाणावें | | | गुरु ज्या नक्षत्रीं असेल तेथपासून जन्मनक्षत्रापावेतों मोजून ज्या स्थानीं पडेल त्या स्थानाचें फल जाणावें. | | | शुक्र ज्या नक्षत्रीं असेल तेथपासून जन्मनक्षत्रापावेतों मोजून ज्या स्थानीं पडेल त्या स्थानाचें फल जाणावें. | | |
| स्थानें | नक्षत्रें. | फळें | स्थानें | नक्षत्रें | फळें | स्थानें | नक्षत्रें | फळें |
| मस्तकीं | ३ | राजप्राप्ति | मस्तकीं | ४ | राज्यप्रा. | मुखावर | ३ | उत्तमलाभ |
| मुखावर | १ | धन | उ. हातावर | ४ | लक्ष्मीप्रा. | मस्तकावर | ५ | शुभ |
| नेत्रांवर | २ | प्रीतिला. | कंठावर | १ | धनला. | उ. पायावर | ३ | क्लेशहानि |
| नाभीवर | ५ | लक्ष्मीप्रा. | मुखावर | ५ | पीडा. | डा. पायावर | ३ | क्लेशहानि |
| पायांवर | ६ | प्रवास | पायांवर | ६ | मृत्यु | हृदयावर | २ | धनसौख्य |
| डावे हातावर | ४ | धनलाभ | डा. हाताव. | ४ | सुखप्रा. | हातांवर | ८ | मित्रसुख |
| द. हात | ४ | धनलाभ | नेत्रांवर | ३ | सुखप्राप्ति | गुह्यावर | ३ | स्त्रीलाभ. |
| गुदावर | २ | बंधन, मरण | | | | | | |

२ त्याचे फळ राज्यप्राप्ति ॥ पुढें मुखावर ३ मिष्टान्नभक्षण ॥ प्रत्येक खांद्यावर १, १ बळकट असावें ॥ भुजावर १, १ याचेंही फळ बळकट ॥ हाता वर १, १ चोर ॥ हृदयावर ५ ऐश्वर्य ॥ नाभीवर १ सौख्यप्राप्ति ॥ गुह्यावर १ परदारा लंपट ॥ जानूवर १, १, देशांतरगमन करील ॥ प्रत्येक पायावर ३, ३ अल्पायुषी ॥ याप्रमाणे जेथे जन्म नक्षत्र पडेल ते फळ सांगावे ॥

## लग्नशुद्धीस पंचकपाहणें

गततिथियुतलग्नं नंदहृत्शेषकं चवसुयमयुगषट्‍क्षोणिसंख्याक्रमेण ॥ रुगनलनृपचोरं मृत्युदं पंचकं स्याद्भुनगृहनृपमार्गोद्वाहके वर्जनीयं ॥१॥

टी०– गत तिथी मोजून त्यांत लग्न मेळवावे आणि ९ नवांनी भागावें शेष उरेल त्याचे फळ ॥ ८ उरले तर रोग पंचक ते भुंजास वर्ज्य ॥ ३ उरले तर अग्नि पंचक तें गृहारंभास वर्ज्य ॥ ४ उरले तर राजपंचक हें आणि ६ उरले तर चोर पंचक ॥ ही दोन्हीं पंचके गमन लग्नीं वर्जावीं ॥ १ उरला तर मृत्यु पंचक ते विवाहास वर्ज्य ॥ या शिवाय शेषांक राहिल्यास नि-पंचक जाणावें तें सर्वास उक्त होय ॥

## वारपरत्वें पंचकें वर्ज्य

रवौरोगं कुजेवन्हि- सोमेतु नृपपंचकं ॥ बुधेचोरं शनौमृत्युः पंचकानितुवर्जयेत् ॥१॥

टी०– रविवारी रोग पंचक ॥ मंगळवारीं अग्नि पंचक ॥ सोमवारी राज पंचक ॥ बुधवारीं चोर पंचक ॥ शनिवारीं मृत्यु पंचक ॥ अशीं हीं पंचकें वाराचे वारास वर्ज्य जाणावीं ॥

---

## दिनमानरात्रिमान

अयनादिकवासररामहताः गगनानलबाणशशां
कयुताः॥ परिभाजितशून्यरसैर्घटिकाकर्कादिनि
शामकरादिदिनं॥१॥

टी०- अयन ह्मणजे कर्क संक्रांती पासून मकर संक्रांती पर्यंत महिने ६ त
सेच मकरा पासून कर्का पावेतों महिनें ६, ज्या दिवसाचें दिनमान कराया
चें तेथ पर्यंत एकंदर दिवस मोजून त्यांना ३ गुणून जे अंक येतील त्यांत
१५३० मिळवावे मग ६० भागून शेष उरेल तें रात्रिमान जाणावें आणि
मकर संक्रांती पासून मोजलें असतां दिनमान जाणावें॥

## दिवस किती आला तें पाहाणें

पादप्रभानगयुतारहितान्चमेषात् षट्स्विंदुनात्रि
युगबाणशराब्धिरामैः॥ स्याद्वाजको दिनदलस्य
नगाहतस्य पूर्वेगनास्युरपरे दिनशेषनाड्यः॥२॥

टी०-आपली छाया पावलें करून मोजावी॥ जीं पावलें येतील त्यांत ७ मि
ळवावे आणि मेष संक्रांती पासून कन्या पर्यंत इंदु ह्म० एक त्यांत वजा करा
वा त्याचे पुढें तुळा पासून मीन पर्यंत जी संक्रांत असेल त्या संक्रांतीचा क्षेप-
क तो वजा करावा, ते असे, तूळ ३ वृश्चिक ४ धन ५ मकर ५ कुंभ ४ मीन ३
या प्रमाणें अंक वजा करून निराळे मांडून ठेवावे॥ नंतर दिन दळ ह्मणजे
१५ यांस ७ यांनीं गुणून १०५ आले यांस मागें ठेवलेल्या अंकांनी भागावें भा
गांक येईल त्या घटका झाल्या परंतु पूर्वार्द्धीं दिवस घटका आल्या आणि उ-
त्तरार्द्धीं दिवस उरला हें सांगावें.

## रात्र किती झाली तें पाहाणें

सूर्यभान्मध्यनक्षत्रंसप्तसंख्याविशोधितं॥ त्रिंश
निघ्नंनवहृतं गनारात्रिः स्फुटा भवेत्॥१॥

टी०—राशीस मध्ये जें नक्षत्र आले असेल तिनकीं नक्षत्रें सूर्य नक्षत्रा पासून मोजून स्थान ७ कमी करावे शेष राहील ते विसांनी गुणून ९ यांनी भागावे शेष मध्या उरेल तित की रात्र भोग्य झाली असे समजावे ॥

## अंतरंग बहिरंग नक्षत्रें

सूर्यभादुडुगणंपुनःपुनर्गण्यतामिनिचतुष्टयंत्रयं॥
अंतरंगबहिरंगसंज्ञकंतत्रकर्मविदधीतनादृशं॥१॥

टी०—सूर्य नक्षत्रा पासून प्रथम ४ नक्षत्रे तीं आंत चालिची होत ॥ मग ३ नक्षत्रें ती बाहेर चालीचीं होत ॥ अ शाकमानें दिवस नक्षत्रा पावेतों मोजावें पुरें आणण्यास व पोहचवण्यास उक्त होय ॥

## सूतिकास्नान

करेंद्रभाग्यानिलवासवांत्यमैत्रेंदवाश्विध्रुवभेन्हि पुंसां॥तिथावरिक्तेशुभमामनंतिप्रसूतिकास्नानवि धिंमुनींद्राः॥१॥

टी०— हस्त, ज्येष्ठा, पूर्वाफल्गुनी, स्वाती, धनिष्ठा, रेवती, अनुराधा, मृग, अश्विनी, आणि ध्रुव नक्षत्रें अशीं ज्या दिवशीं असतील तो दिवस सूतिका स्नानास उक्त होय परंतु रिक्ता तिथि वर्ज्य करावी असे मुनीद्र मानिताहेत॥

---

॥ इति शुकदेव विरचिते ज्योतिषसारे संवत्सरादि चक्र
प्रकरणात समाप्त श्रीगजाननार्पणमस्तु॥

